असो गाधीचा उद्धार जाहला ॥ आपुले स्वरूपीं मेळविला ॥ हा इतिहास सांगितला ॥ मायेनिमित्त श्रीरामा ॥२९॥ मग बोले रघुनंदन ॥ माया व्हावया काय कारण ॥ स्वरूप निर्विकार निर्गुण ॥ तेथें स्फुरण कां जाहलें ॥१३०॥ पिंड ब्रह्मांड नानायोनी ॥ नानावर्ण नानाखाणी ॥ हे मुळींहून मायेची करणी ॥ मिथ्याभूत सर्वही ॥३१॥ कीं निर्गुणा[1] सगुण लागलें ॥ अव्यक्त तें व्यक्तीस आलें ॥ अनामास नाम ठेविलें ॥ कां अंग लाविलें अनंगा[2] ॥३२॥ ऐकोन श्रीरामाचा प्रश्न ॥ आनंदला ब्रह्मनंदन ॥ म्हणे बा रे तूं परिपूर्ण चैतन्यघन ॥ जाणोन प्रश्न करितोसी ॥३३॥ रामा तुझेंचि दिव्य ज्ञान ॥ तुजलाचि सांगतों परतोन ॥ जैसें सुरतरूचें[3] फळ घेऊन ॥ त्यासचि नैवेद्य दाविजे ॥३४॥ कीं कनकाद्रीचें[4] सुवर्ण घेऊन ॥ त्यावरीच अलंकार घातले घडून ॥ कीं क्षीरसिंधूचें दुग्ध घेऊन ॥ पुन्हां त्यासीच समर्पिलें ॥३५॥ कीं सागरींचें उदक मेघ नेती ॥ मागुती सरिता[5] आणूनि समर्पिती ॥ तैसा श्रीरामा तुजप्रती ॥ तुझेंच ज्ञान सांगतों ॥३६॥ तरी तुवां केला प्रश्न ॥ स्वरूपीं कां जाहलें स्फुरण ॥ तरी येविषयीं दृष्टांत सांगेन ॥ ऐक रामा निर्धारें ॥३७॥ जैसा कोणी पुरुष निद्रिस्थ ॥ पहुडला असे चिंतारहित ॥ तो स्वइच्छें होऊन जागृत ॥ कार्य कांहीं आठवी ॥३८॥ कीं समुद्रीं उठे लहरी ॥ तैसी ध्वनि उठे चिदंबरीं[6] ॥ मी म्हणोन निर्धारीं ॥ हांक थोर जाहली ॥ ३९ ॥ एक असतां ब्रह्मानंद ॥ निःशब्दीं उठिला शब्द ॥ ते ध्वनि मायानाम प्रसिद्ध ॥ वेदांतशास्त्र गर्जतसे ॥१४०॥ जिचें नाम मूळप्रकृती ॥ जी आदिपुरुषाची चिच्छक्ती ॥ तिनें शेजे निजवोनि पती ॥ सृष्टिकार्य आरंभिलें ॥४१॥ येवढें ब्रह्मांड केलें निर्माण ॥ परी पतीस कळों नेदी वर्तमान ॥ ते परम कवटाळीण[7] ॥ नसतींच दैवतें उभीं केलीं ॥४२॥ विधि विष्णु उमाकांत ॥ हीं तिन्ही बाळें जिचे आज्ञेंत ॥ नेत्र उघडोन निश्चित ॥ पाहों नेदी स्वरूपाकडे ॥४३॥ ब्रह्मसुखाचे समुद्रांत ॥ बुडाले हे जीव समस्त ॥ परी तेथींची गोडी किंचित ॥ चाखों नेदी कोणातें ॥४४॥ चैतन्य इनेंच झांकिलें ॥ इनें अरूप रूपासि आणिलें ॥ अनंतब्रह्मांडींचे पुतळे ॥ एकेचि सूत्रें नाचवी ॥४५॥ इनें निर्गुणास गुण लाविले जाण ॥ अनामासी ठेविलें नामकरण ॥ निराकारासी आकारून ॥ जीवित्वासी आणिलें ॥ ४६ ॥ हे परम पतिव्रता साचार ॥ पतीस न कळतां जाहली गरोदर ॥ ब्रह्मांड रचिलें समग्र ॥ नानाविकारेंकरूनियां ॥४७॥ नानायोनी विकार भाव ॥ इनें फांसां पाडिले अवघे जीव ॥ गाधीस कैसें दाविलें लाघव[8] ॥ मिथ्या कर्तृत्व नसतेंचि ॥४८॥ कोणी मुरडे[9] स्वरूपाकडे ॥ त्यासी नसतेंचि घाली सांकडें ॥ अथवा स्वर्गसुख रोकडें[10] ॥ पुढें दावून भुलवी कीं ॥४९॥ निजात्मसुखगोडी निःसीम ॥ ती जीवासी केली कडू परम ॥ विषयविषरूप मोहभ्रम ॥ तेथें गोडी आणिली ॥१५०॥ असो ऐसी ते आदिशक्ती ॥ तिनें इच्छा धरिली चित्तीं ॥ तिसीच गुणक्षोभिणी म्हणती ॥ त्रिगुण निश्चित केले इनें ॥ ५१ ॥ सत्व रज तम जाण ॥ तेचि विधि विष्णु ईशान ॥ त्रिशक्तिरूपें धरून ॥ तिहीं ठायीं आपण जाहली ॥ ५२ ॥ ज्ञानशक्तीच्या आधारेंकरून ॥ ज्ञानपंचक केलें निर्माण ॥ तें अंतःकरणचतुष्टय पूर्ण ॥ तत्त्वविद[11] म्हणती ते ॥ ५३ ॥ क्रियाशक्तीच्या

१ निर्गुण ब्रह्म. २ शरीररहिताला. ३ कल्पवृक्षाचें. ४ मेरूचें. ५ नद्या. ६ चैतन्यरूप आकाशांत. ७ कावेबाज. ८ कौशल्य. ९ वळे. १० प्रत्यक्ष. ११ तत्त्व जाणणारे.

आधारें रजोगुण ॥ प्रसवला तो पंचकें तीन ॥ एक ज्ञानेंद्रियपंचक पूर्ण ॥ कर्मेंद्रियपंचक दुसरें ॥ ५४ ॥ तिसरें जाणावें वायुपंचक ॥ आतां तमद्रव्यशक्तिआधारें देख ॥ विषयपंचक निर्मिलें सुरेख ॥ पंचतन्मात्रा म्हणती ज्यातें ॥ ५५ ॥ ऐसीं पंचवीस तत्त्वें निःशेष ॥ मग केला पर[1]-स्परानुप्रवेश ॥ [2]कर्दम करूनि विशेष ॥ ब्रह्मांड हें रचियेलें ॥ ५६ ॥ ब्रह्मांड ही पेठ पूर्ण ॥ नाना रीतीं रची कमलासन ॥ चहूं खाणींचीं केणीं[3] आणून ॥ चौऱ्यायशीं लक्ष जीव केले ॥ ५७ ॥ ऐसा ब्रह्मा पेठा भरीत ॥ विष्णु तयांचा प्रतिपाळ करीत ॥ दहा अवतारांच्या घिरट्या घेत ॥ संकटीं तारीत भक्तांतें ॥ ५८ ॥ सृष्टींत दोष होतां अपार ॥ परम क्रोधी तो [4]अपर्णावर ॥ तत्काळ करी संहार ॥ टाकी सर्व मोडोनियां ॥ ५९ ॥ विराट जें रचिलें ढिसाळ[5] ॥ हें शिवाचें देह स्थूळ ॥ पायांचे तळवे तें पाताळ ॥ [6]प्रपद रसातळ जाणिजे ॥ १६० ॥ याचा सांगतों निर्णय ॥ ज्ञान जेणें प्राप्त होय ॥ सकळ संतांचे समुदाय ॥ ऐकोन बहुत आनंदती ॥ ६१ ॥ [7]गुल्फद्वय तें महातळ ॥ पोटरिया [8]जानुयुगुळ ॥ तें तळातळ आणि वितळ ॥ विराटाचें जाण पां ॥ ६२ ॥ कटिप्रदेश तें महीतळ जाण ॥ नैर्ऋत्यलोक तें गुदस्थान ॥ दक्षप्रजापति तो शिश्न ॥ विराटाचें जाण पां ॥ ६३ ॥ जठरामाजी पोकळ ॥ तें हें अवघें नभमंडळ ॥ जठराग्नि तो वडवानळ ॥ महा कल्लोळ धडकतसे ॥ ६४ ॥ सप्तसमुद्र उदरीं सकळ ॥ ज्योतिर्लोक तें वक्षःस्थळ ॥ महर्लोक तें कंठनाळ ॥ वदनकमळ जनलोक ॥ ६५ ॥ वरुणलोक ते जिव्हा जाण ॥ यमलोक त्या दंतदाढा तीक्ष्ण ॥ अश्विनौदेव तें घ्राण ॥ भ्रुकुटिस्थान भूर्लोक ॥ ६६ ॥ तपोलोक तें कपाळ ॥ मस्तक ब्रह्मभुवन निर्मळ ॥ वासरमणि तो नेत्र तेजाळ ॥ प्रकाश-कल्लोळें ब्रह्मांड भरी ॥ ६७ ॥ पातीं उघडी त्या नांव दिवस ॥ झांकितां रात्र म्हणती त्यास ॥ उभयहस्तरूपें अमरेश ॥ कर्तव्य करी सर्वही ॥ ६८ ॥ चंद्रमा तयाचें मन ॥ वनस्पती रोमावळी पूर्ण ॥ त्वचा ते जाण प्रभंजन ॥ कर्दम पूर्ण मांस तें ॥ ६९ ॥ नाडीचक्र गंगा निश्चितीं ॥ पृष्ठी तिकडे अधर्मरीती ॥ कनकाचळ तो सुमती ॥ शिरोभाग जाणिजे ॥ १७० ॥ अस्थि त्या जाण पाषाण ॥ फेण ती लाळ ओळखें खूण ॥ दहिंवर तें मूत्र पूर्ण ॥ [9]जळ तें रक्त जाणिजे ॥ ७१ ॥ पाषाणगर्भ मज्जा सत्य ॥ पर्जन्य तें शिवाचें रेत ॥ दुर्भिक्ष ती क्षुधा अद्भुत ॥ जलशोष अत्यंत तृषा पूर्ण ॥ ७२ ॥ आळस तो शीतकाळ ॥ पर्जन्यकाळ ती निद्रा सबळ ॥ उष्णकाळ तें मैथुन केवळ ॥ वृष्टि व्हावया तावीतसे ॥ ७३ ॥ झंझाट वायु तें धांवणें ॥ वाहाटुळी तयाचें वळणें ॥ दशदिशा पसरल्या संपूर्णें ॥ तें पसरण तयांचें ॥ ७४ ॥ स्तब्ध वायु तें आकुंचन ॥ उकाडा तो निरो-धन ॥ जळवृष्टीची इच्छा काम पूर्ण ॥ सृष्टिसं[10]हारण क्रोध तो ॥ ७५ ॥ शोक तो महा अनर्थ ॥ मोहसृष्टिपालन यथार्थ ॥ भय तो मृत्यु ओळख सत्य ॥ विराटपुरुषाचें राघवा ॥ ७६ ॥ पीत[11]वसन तें अंतःकरण ॥ [12]रमाबंधु तयाचें मन ॥ विरिंचि बुद्धि संपूर्ण ॥ चित्त नारायण जाणिजे ॥ ७७ ॥ देवदत्त तो मुख्य प्राण ॥ धनंजय पाताळीं आपण ॥ दिशा तयाचे कर्ण ॥ पवन संपूर्ण त्वचा त्याची ॥ ७८ ॥ अग्नि तयाचें वदन ॥ चरण पाताळीं वामन ॥ ऐसा विराटपुरुष संपूर्ण ॥ सप्तावरणमय असे ॥ ७९ ॥ भूगोल दशगुणें प्रबळ ॥ बाह्य ओळखें पृथ्वीमंडळ ॥

---

१ पंचभूतांचें परस्परांत मिसळणें. २ चिखल. ३ वस्तु. ४ शंकर. ५ मोठें. ६ पायांचीं अग्रें. ७ दोन घोंटे. ८ जांघा. ९ पाणी. १० नाश करणें. ११ विष्णु. १२ चंद्र.

त्या दशगुणें समुद्रजळ ॥ असंभाव्य पसरलें ॥ १८० ॥ उदकाचे दशगुण ॥ धडाडीत महाअग्न ॥ त्या दशगुणें प्रभंजन ॥ आवरण पैं जाणिजे ॥८१॥ समीरा दशगुणें साचार ॥ वाढ असे हें अंबर ॥नभा दशगुणें अहंकार॥वेष्टिलासे सघन पैं॥८२॥अहंकारा दशगुणें निश्चित ॥ व्यापिलें असे महत्तत्त्व ॥ त्या दशगुणें अद्भुत ॥ मायाआवरण शेवटीं ॥८३॥ मायेपलीकडे जें उरलें जाण ॥ तें केवळ स्वरूप निर्वाण ॥ तें इतुकें तितुकें थोर लहान ॥ व्यक्तिवर्ण नाहीं तेथें ॥ ८४ ॥ ऐसा मायेचा खेळ अचाट ॥ आतां ऐकें इचा शेवट ॥ पंच प्रळय स्पष्ट ॥ वेदांतशास्त्रीं निवडिले ॥ ८५ ॥ पिंडीं नित्यप्रळय संपूर्ण ॥ निद्रा म्हणती त्यालागून ॥ तत्त्वांसमवेत स्थूळलिंगदेह जाण ॥ बुडोन जाय निद्रार्णवीं ॥ ८६ ॥ हा नित्य-प्रळय जाण ॥ आतां महाप्रळय तें मरण ॥ जाय स्थूळदेह संहारून ॥ सर्व जन देखती ॥८७॥ आतां ब्रह्मांडींचा प्रळय निश्चित ॥ चारही युगें सहस्र वेळां जात ॥ तोंवरी ब्रह्मा होय निद्रिस्थ ॥ मग राहतो सृष्टिक्रम ॥ ८८ ॥ अवघी सृष्टि जाय संहारुनी ॥ सर्व जळमय होय ते क्षणीं ॥ बत्तीस लक्ष गांव चढे पाणी ॥ जाय बुडोनी ब्रह्मांड ॥ ८९ ॥ सप्तचिरंजीव बुडोन जात ॥ सत्यलोकीं पाणी आदळत ॥ तेव्हां वट-पत्रशायी भगवंत ॥ ब्रह्मा निद्रिस्थ नाभिकमळीं ॥ १९० ॥ मग कमलोद्भव होय जागृत ॥ जळ आटोनि समस्त ॥ यथापूर्व कल्प येत ॥ वेद निश्चित बोलतसे ॥ ९१ ॥ पूर्विल्यासारिखें होय सकळ ॥ मागुती अवतार धरी घननीळ ॥ अवतारचरित्र सकळ ॥ पूर्विल्या ऐसें दावीत ॥ ९२ ॥ हा नित्यप्रळय संपूर्ण ॥ आतां महाप्रळय ऐक दारुण ॥ आधीं शतसंवत्सर घन ॥ न वर्षेचि कदापि ॥ ९३ ॥ तेणें जीवसृष्टीचा संहार ॥ सवेंच उगवती द्वादश मित्र ॥ वडवानळ तो महातीव्र ॥ भूमंडळ जाळीत पैं ॥ ९४ ॥ तापतांचि उर्वीमंडळ ॥ भोगींद्रमुखींचे निघती ज्वाळ ॥ तेणें सप्तपाताळ सकळ ॥ भस्म होती एकदांचि ॥९५॥ मग शतसंवत्सरपर्यंत ॥ शुंडाधारीं मेघ वर्षत ॥ जैसी जळगार जळीं विरंत ॥ जगती समस्त वितळे तेवीं ॥ ९६ ॥ उपरी महातेज अग्न ॥ जळ शोषी न लगतां क्षण ॥ तया तेजासी प्रभंजन ॥ टाकील ग्रासून क्षण-मात्रें ॥ ९७ ॥ मग तो अद्भुत अनिळ ॥ क्षणें गिळील निराळ ॥ त्या गगनासी समूळ ॥ तमोगुण ग्रासील पैं ॥९८॥ तमासी ग्रासील रजोगुण ॥ रज सत्वीं होईल लीन ॥ सत्वास महत्तत्त्व मिळोन ॥ समरसेल मायेंत ॥ ९९ ॥ माया होय स्वरूपीं लीन ॥ स्वरूप स्वरूपीं समाधान ॥ जें ब्रह्मा-नंदपरिपूर्ण ॥ बोलतां मौन वेदशास्त्रां ॥२००॥ निर्गुण निर्विकार निरुपम ॥ पूर्ण शांति योगक्षेम ॥ असतां पूर्ण जाहले निःसीम ॥ केला क्रम विस्मयें ॥ १ ॥ तें तूं स्वरूप निर्वाण ॥ राघवा नटलासी परिपूर्ण ॥ सच्चिदानंद सत्य जाण ॥ हेंही बोलणें न साहे ॥२॥ आटोनि सर्व अलंकार ॥ एकरस जाहला निर्विकार ॥ आटलें पिंडब्रह्मांड समग्र ॥ तोचि तूं साचार श्रीरामा ॥ ३ ॥ कैंचें वैकुंठ कैंचें कैलास ॥ लोपला अवघा माया-विलास ॥ शेषशायी जगन्निवास ॥ हाही भास मावळला ॥४॥ वटपत्रशायी सर्वेश्वर ॥ हे नित्यकल्पींची गोष्ट साचार ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ स्वस्वरूपीं मिळाले ॥५॥ उरलें निर्विकार स्वरूप ॥ तें तूं राघवा निर्विकल्प ॥ अच्छेद्य अभेद्य अरूप ॥ आत्माराम परिपूर्ण ॥ ६ ॥

१ वायु. २ आकाश. ३ बेंबीमध्यें. ४ भयंकर. ५ मेघ. ६ सूर्य. ७ वितुळते. ८ सामावेल. ९ ज्याला दृष्टांत देण्याजोगी जगांत दुसरी वस्तु नाहीं असा.

स्वरूपनिर्धार होतां पूर्ण ॥ श्रीरामें झांकिले नयन ॥ ब्रह्मानंदसागरीं लीन ॥ रघुनंदन जाहला ॥ ७ ॥ वसिष्ठही आनंदें डुलत ॥ खुंटला बोल राहिली मात ॥ गुरुशिष्य देवभक्त ॥ एकरूप जाहले ॥ ८ ॥ विराल्या रघुनाथाच्या शक्ती ॥ स्वस्वरूपीं पावला विश्रांती ॥ वसिष्ठही आत्मस्थिती ॥ श्रीरघुनाथीं बिंबला ॥ ९ ॥ अठरा दिवसपर्यंत ॥ श्रीराम जाहला समाधिस्थ ॥ विसरला अवतारधारणहेत ॥ राम समरसला आत्मरूपीं ॥ २१० ॥ शरीर जाहलें अचेतन ॥ हृदयीं आकर्षिले प्राण ॥ [2]गजबजिलें दशरथाचें मन ॥ म्हणे अनर्थ पूर्ण जाहला ॥११॥ गजबजिला विश्वामित्र ॥ म्हणे काय संपला अवतार ॥ बंदीं पडले सुरवर ॥ सोडवील कोण तयांतें ॥ १२ ॥ आतां कैंचें [3]यागरक्षण ॥ तत्काळ दशरथ देईल प्राण ॥ आजि जाहले अष्टादश दिन ॥ रघुनंदन सावध नोहे ॥ १३ ॥ ऐकतां [4]निर्वाणज्ञान थोर ॥ राम जाहला निर्विकार ॥ मग वसिष्ठासी विश्वामित्र ॥ घाली नमस्कार तेधवां ॥१४॥ म्हणे महाराजा ब्रह्मसुता ॥ सावध करीं रघुनाथा ॥ पुढें अवतारकार्य तत्वतां ॥ बहु असे तें जाणसी तूं ॥ १५ ॥ मग वसिष्ठ म्हणे श्रीरामा ॥ सावध होईं मेघश्यामा ॥ चिदानंदा पूर्णब्रह्मा ॥ यागरक्षणा आतां जाइंजे ॥१६॥ जाणोनियां स्वरूपातें ॥ सुखें धर्मरीतीं वर्तें ॥ पाळोनियां सज्जनातें ॥ दुष्ट क्षयातें पाववीं ॥१७॥ जैसीं केशनखें आंगीं वाढती ॥ आपुलीं आपणातें रुपती ॥ तीं छेदितां सुख निश्चितीं ॥ तैसे दुष्टमती वधावे ॥ १८ ॥ समाधि आणि [5]व्युत्थान ॥ दोन्ही अंतरीं जिरवून ॥ [6]तुर्या [7]उन्मनी ओलांडून ॥ आनंदघन वर्तावें ॥ १९ ॥ तटस्थता टाकोनि वेगीं ॥ रामा उघडी समाधि भोगीं ॥ श्रीरामा तूं राजयोगी ॥ सर्व संगीं निःसंग ॥ २२० ॥ जो आपुले ठायीं भ्रमें वर्तत ॥ तया जगही भ्रममय भासत ॥ भ्रमरूप ब्रह्मांड दिसत ॥ भ्रमेंचि मृत्यु जवळी ये ॥२१॥ ईश्वराचें स्वरूप निर्वाण ॥ भ्रमें नाकळे जाहला दीन ॥ आपण आहें कोणाचा कोण ॥ भ्रमें पूर्ण नोळखे ॥ २२ ॥ भ्रमेंकरूनि जन्ममरण ॥ भ्रमेंकरून अधःपतन ॥ तो भ्रम गेलिया संपूर्ण ॥ आपणाविण दुजें नसे ॥२३॥ आपण ब्रह्मस्वरूप होतां पूर्ण ॥ ब्रह्मरूप दिसे त्रिभुवन ॥ शत्रु मित्र थोर लहान ॥ ब्रह्मरूप सर्व दिसे ॥ २४ ॥ घागरी मडकीं रांजण ॥ आंत बिंबला चंडकिरण ॥ परी सूर्यासी स्त्रीपुरुषनपुंसकपण ॥ कल्पांतींही घडेना ॥ २५ ॥ सोनें साच लटिकें अलंकार ॥ तरंग मिथ्या एक [8]सागर ॥ [9]पट मिथ्या तंतू निर्धार ॥ तैसें चराचर ब्रह्मरूप ॥ २६ ॥ नाना घट एक अंबर ॥ नाना मणि एक सूत्र ॥ नाना मातृका एक ओंकार ॥ ब्रह्म सर्वत्र तैसेंचि ॥ २७ ॥ ह्मणोन सुटतां हृदयग्रंथि ॥ सर्व संशयां होय निवृत्ति ॥ कर्मींच होय ब्रह्मप्राप्ति ॥ त्रिजगतीं ब्रह्मरूप ॥२८॥ उभय पक्षांचे बळेंकरूनी ॥ विहंगम संचरती गगनीं ॥ तैसें कर्मब्रह्म ऐक्य करूनी ॥ स्वानंदवनीं विचरावें ॥ २९ ॥ जेथें निमाल्या सकळ [10]आंधि ॥ श्रीरामा पूर्ण तेचि समाधि ॥ तटस्थता हे उपाधि ॥ एकदेशी जाण पां ॥ २३० ॥ अंतरीं जाणोनि निर्वाणज्ञान ॥ बाहेर दाविजे भिन्नाभिन्न ॥ अंतरीं बोध परिपूर्ण ॥ बाहेर जडपण दाविजे ॥ ३१ ॥ अंतरीं करून पूर्ण त्याग ॥ बाहेर दाविजे लौकिक भाग ॥ अंतरीं होऊनि निःसंग ॥ विषयीं विराग धरावा ॥३२॥



१ लीन झाला. २ घाबरलें. ३ यज्ञ पार पाडणें. ४ ब्रह्मज्ञान. ५ समाधिविसर्जन. ६ चौथी अवस्था. ७ पांचवी अवस्था. ८ समुद्र. ९ वस्त्र. १० मनांतील दुःखें.

बाहेर लटिकेंच कृपणपण ॥ परी अंतरीं समसमान ॥ रामा तोचि साधक पूर्ण ॥ लोकसंगविवर्जित ॥३३॥ जैसा बीजामधूनि वट थोर ॥ निघे अद्भुत पर्वताकार ॥ तैसें आत्मरूपीं चराचर ॥ जाहलें जाणोनि वर्तावें ॥ ३४ ॥ तंतू आणि पट पूर्ण ॥ दोघांसी नव्हे वेगळेपण ॥ घट मृत्तिकेसी टाकून ॥ वेगळा नोहे सर्वथा ॥ ३५ ॥ तैसें जग आणि जगदीश्वर ॥ भिन्न नोहे साचार ॥ हें ज्ञान जाणोनि निर्विकार ॥ वर्तें सदा तूं राघवा ॥ ३६ ॥ अविद्या ही विवशी वाड ॥ निजात्मधनासी मध्यें आड ॥ तिचें गुरुकृपें छेदोनि बंड ॥ वर्तें अखंड राघवा ॥ ३७ ॥ प्रपंचसमुद्र नसतांचि दिसे ॥ गुरुकृपेचे नावेंत बैसें ॥ निवृत्तितटीं समरसें ॥ आत्मप्रकाशेंकरूनियां ॥ ३८ ॥ अभ्यासेंविण विद्या सकळा ॥ तत्काळ होती राघवा विकळा ॥ तैसी नोहे ज्ञानकळा ॥ तारी अबळा निजस्पर्शें ॥ ३९ ॥ लोहीं झगटतां परिस पूर्ण ॥ मग तें जन्मवरी जाहलें सुवर्ण ॥ तैसें होतां आत्मज्ञान ॥ जन्ममरण त्यासी कैंचें ॥२४०॥ म्हणोन साधक जे सज्ञान ॥ तिहीं प्रतिपाळावें गुरुवचन ॥ सकळ अकार्या टाकून ॥ सन्मार्गेंच वर्तावें ॥ ४१ ॥ रामा तूं गुरु म्हणसील कोण ॥ जो तत्त्ववेत्ता अनुभवी पूर्ण ॥ शिष्य व्हावा ज्ञाननिपुण ॥ ऐसी मति जयासी ॥ ४२ ॥ साधकीं करावें हेंचि त्वरित ॥ बोधवज्र घेऊन निश्चित ॥ जन्ममरण-दुःखपर्वत ॥ चूर्ण करूनि टाकावे ॥ ४३ ॥ मोक्षतरूचें बीज हें सत्य ॥ अद्वैतज्ञान क्रियासहित ॥ सदा चालिजे धर्मपंथ ॥ सर्व कुमतें टाकोनियां ॥ ४४ ॥ ज्याचें शुद्ध मन तोचि शुचिष्मंत ॥ सद्विवेक वसे तोचि पंडित ॥ जो गुरुभक्तीसी नव्हे रत ॥ तरी विष यथार्थ तोचि प्याला ॥ ४५ ॥ कासया ग्रंथ शतसहस्र ॥ मुख्य धर्म तो परोपकार ॥ अधर्म नाम त्या साचार ॥ परपीडा करणें जें ॥ ४६ ॥ याकारणें वत्सा रघुनाथा ॥ तूं समाधि ग्रासोनियां आतां ॥ धनुष्य घेऊनियां तत्त्वतां ॥ मखरक्षणा जाइंजे ॥ ४७ ॥ ऐकतां सद्गुरूचें वचन ॥ श्रीराम तो सुहास्यवदन ॥ उघडी अमल राजीवनयन ॥ जे कां आकर्ण विकासले ॥ ४८ ॥ करूनि सद्गुरूसी नमस्कार ॥ करी प्रदक्षिणा त्रिवार ॥ सद्गद जाहलें अंतर ॥ अष्टभावेंकरोनियां ॥ ४९ ॥ मग म्हणे ब्रह्मपुत्र ॥ बा रे दावीं आतां लीलाचरित्र ॥ ते गुरुआज्ञा राजीवनेत्र ॥ मस्तकीं वंदोनि निघाला ॥ २५० ॥ दिव्य रथीं बैसला रघुनाथ ॥ सवें कौशिक आणि सुमित्रासुत ॥ लक्षोनि सिद्धाश्रमाचा पंथ ॥ सुमुहूर्तेंसीं चालिला ॥ ५१ ॥ दशरथ आणि ब्रह्मसुत ॥ भागीरथीपर्यंत बोळवीत ॥ जातां उत्तम शकुन बहुत ॥ श्रीरामासी जाहले ॥ ५२ ॥ त्या शकुनांचा करूनि अर्थ ॥ रायासी सांगे विरिंचिसुत ॥ विजयश्रियेसीं रघुनाथ ॥ अयोध्येसी येईल सुखें ॥ ५३ ॥ बोळवूनि तेव्हां रघुनाथ ॥ माघारे आले वसिष्ठ दशरथ ॥ पुढें कथा गोड बहुत ॥ अमृताहूनि विशेषें ॥ ५४ ॥ रामविजय वैरागर देख ॥ षष्ठाध्याय हिरा अलोलिक ॥ हृदयपदकीं जडोत सुरेख ॥ संत श्रोते अनुभवी ॥ ५५ ॥ ब्रह्मानंदा रामचंद्रा ॥ श्रीधरवरदा गुणसमुद्रा ॥ हा षष्ठाध्याय रघुवीरा ॥ सदा हृदयीं वसो माझ्या ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर ॥ संमत वाल्मीकनाटकाधार ॥ सदा परिसोत पंडित चतुर ॥ षष्ठाध्याय गोड हा ॥ २५७ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥

# अध्याय ७



श्रीगणेशाय नमः ॥ [1]चंडकिरणसुकुलमंडना ॥ [2]अमलकमलाक्षा रघुनंदना ॥ [3]जलजोद्भवजनका [4]जगज्जीवना ॥ पतितपावना श्रीरामा ॥ १ ॥ [5]विद्वज्जनमानसमराळा ॥ [6]कामांतकध्येया भक्तवत्सला ॥ अनंतवेषा त्रिभुवनपाळा ॥ दीनदयाळा रघुपते ॥ २ ॥ जय जय [7]अविद्या-विपिनदहना ॥ निजभक्तकौसल्यागर्भरत्ना ॥ जगदुद्धारा मुनिजनरंजना ॥ [8]दुर्जनभंजना राघवेशा ॥ ३ ॥ मागें षष्ठाध्यायीं कथन ॥ वसिष्ठें रामास उपदेशून ॥ मग विश्वामित्र चालिला घेऊन ॥ यागरक्षणाचेनि काजें ॥ ४ ॥ भागीरथींत करोनि स्नान ॥ [9]कौशिक राम लक्ष्मण ॥ सारोनियां नित्य अनुष्ठान ॥ सत्कर्माचरण वेदोक्त ॥ ५ ॥ मग धनुर्वेदयुक्ती नानामंत्र ॥ कोणे समयीं कैसें प्रेरावें अस्त्र ॥ तें रामासी अवघें मंत्रशास्त्र ॥ विश्वामित्र उपदेशी ॥ ६ ॥ युद्धाच्या नाना युक्ती कळा ॥ विश्वामित्रें सांगतांचि सकळा ॥ राघवें [10]आंकळिल्या त्या वेळा ॥ जैसा आंवळा करतळींचा ॥ ७ ॥ मूर्तिमंत अस्त्रदेवता ॥ रामचरणीं ठेविती माथा ॥ मग हृदयीं प्रवेशती तत्त्वतां ॥ जळीं [11]जळगार जयापरी ॥ ८ ॥ पहावया श्रीरामाचें धैर्यमानस ॥ विश्वामित्र म्हणे तया समयास ॥ येणें मागें जे गेले सिद्धाश्रमास ॥ ताटिकेनें तयांस भक्षिलें ॥ ९ ॥ येणें मार्गें रघुपती ॥ जाऊं न ये भय वाटे चित्तीं ॥ हा मार्ग चुकवून त्वरितगती ॥ जावें सिद्धाश्रमातें ॥ १० ॥ ऐकतां कौशिकाचें वचन ॥ श्रीराम बोले सुहास्यवदन ॥ जेणें विश्वामित्राचे कर्ण ॥ तृप्त होऊन सुखा-वती ॥ ११ ॥ स्वामी तुमचे कृपेंकरुनी ॥ महाकाळ उभाच फोडीन बाणीं ॥ तेथें ताटिकेसी कोण गणी ॥ येच क्षणीं मारीन तीतें ॥ १२ ॥ कौशिकाचे मनीं संशय होता ॥ कीं हीं बाळकें केवीं झुंजतील आतां ॥ त्या संशयाची समूळ वार्ता ॥ रामवचनें निरसली ॥ १३ ॥ मग त्या रथावरी बैसोन ॥ ताटिकेचें हिंदोळिक वन ॥ त्याचि मार्गें तिघे जण ॥ जाते जाहले तेधवां ॥ १४ ॥ [12]वातवेगें जात [13]स्यंदन ॥ अपार भूमि टाकिली क्रमोन ॥ जैसें ऐकतां हरिकीर्तन ॥ पापें खंडोनि भस्म होती ॥ १५ ॥ पुढें देखिलें घोर अरण्य ॥ वृक्ष लागले परम [14]सघन ॥ चालावयासी [13]स्यंदन ॥ मार्ग पुढें फुटेना ॥ १६ ॥ रामासी म्हणे गाधिनंदन ॥ राघवा हेंचि ताटिकारण्य ॥ आतां येईल ती धांवोन ॥ वास काढून मनुष्यांचा ॥ १७ ॥ तों हांक फोडिली अकस्मात ॥ जे ऐकतां दचकेल [15]कृतांत ॥ विश्वामित्र जाहला भयभीत ॥ रक्षीं म्हणत राघवा ॥ १८ ॥ उन्मत्त दशसहस्र गजांचें बळ ॥ ऐसी ताटिका परम सबळ ॥ पर्वत सांठवती विशाळ ॥ ऐसें उदर तियेचें ॥ १९ ॥ ते कुंभकर्णाची भगिनी ॥ बहुत विशाळ राक्षसिणी ॥ शतांचीं शतें [16]गोद्विज धरोनी ॥ दाढेखालीं रगडी-तसे ॥ २० ॥ ताटिका मार्गीं जातां सहज ॥ मुखांत घालोनि रगडी द्विज ॥ वनोपवनीं शोधोनि द्विज ॥ नित्य भक्षी साक्षेपें ॥ २१ ॥

---

१ सूर्यवंशाला भूषण अशा. २ शुद्धकमलनेत्रा. ३ ब्रह्मदेवाच्या जनका. ४ जगताला वांचविणाऱ्या. ५ विद्वन्मनोरूप सरोवरांतील हंसा. ६ शंकराच्या ध्येया. ७ अविद्यारूपी अरण्य जाळणाऱ्या. ८ दुष्टांचा नाश करणाऱ्या. ९ विश्वामित्र. १० घेतल्या. ११ गोठलेलें पाणी, बर्फ. १२ वाऱ्याप्रमाणें. १३ रथ. १४ निबिड, दाट. १५ यम. १६ गाई व ब्राह्मण.

प्रेतरक्तें वस्त्रें भरलीं ॥ तींचि आपणाभोंवतीं वेष्टिलीं ॥ मनुष्यशिरें कर्णीं बांधिलीं ॥ बहु दाट वेळीनें ॥ २२ ॥ नरशिरांच्या अपार माळा ॥ शोणितें चर्चित रुळती गळां ॥ कपाळीं सिंदूर चर्चिला ॥ बाबरझोटी मोकळिया ॥ २३ ॥ द्वादश गांव पसरलें वदन ॥ पांच गांव लांब एकेक स्तन ॥ अगणित राक्षसी संगें घेऊन ॥ रामावरी लोटली ॥ २४ ॥ सखियांसी ताटिका म्हणे तेचि क्षणीं ॥ या पंथें येत मनुष्यांची घाणी ॥ नरमांसाची आजि धणी ॥ तुम्हांस देईन निर्धारें ॥ २५ ॥ विश्वामित्र म्हणे चापपाणी ॥ हे वृक्ष विशाळ गेले गगनीं ॥ आंत गर्जतात राक्षसिणी ॥ ताटिकेसहित पाहें पां ॥ २६ ॥ राम काढी कोदंडाची गवसणी ॥ जैसा याज्ञिकें कुंडींचा फुंकिला अग्नी ॥ कीं अकस्मात उगवला वासरमणी ॥ यामिनीअंतीं पूर्वेसी ॥ २७ ॥ तंव सिंत ओढितां आकर्ण ॥ कडकडाट घोष दारुण ॥ जाहला सवेंच योजिला बाण ॥ प्रळयचपळेसारिखा ॥ २८ ॥ ज्या बाणाचें अर्धचंद्राकार वदन ॥ करी धांवत्या वायूचें खंडण ॥ रामें ओढूनि आकर्ण ॥ तो बाण सोडिला ते समयीं ॥ २९ ॥ वृक्षांसहित राक्षसिणी ॥ मुख्य ताटिका हृदयापासोनी ॥ छेदोन पाडिली ते क्षणीं ॥ घोष गगनीं न समाये ॥ ३० ॥ प्राण जातां राक्षसिणी ॥ ताटिका गर्जली ते क्षणीं ॥ तो घोष विमानीं ऐकोनी ॥ देव सर्व गजबजिले ॥ ३१ ॥ म्हणती विजयी विजयी श्रीरघुवीर ॥ वर्षती देव पुष्पांचे संभार ॥ ब्रह्मानंदें विश्वामित्र ॥ रामालागीं आलिंगी ॥ ३२ ॥ म्हणे रविकुळभूषणा रघुवीरा ॥ राजीवनेत्रा परम सुकुमारा ॥ तुझी धनुर्विद्या रामचंद्रा ॥ आजि म्यां दृष्टीं विलोकिली ॥ ३३ ॥ जैसें एकाचि नामेंकरून ॥ कोट्यवधि पापें जाती जळून ॥ तैसें ताटिकासहित हें वन ॥ एकाचि बाणें खंडिलें ॥३४॥ ताटिकेच्या रक्तेंकरूनी ॥ असंभाव्य तेव्हां रंगली [11]मेदिनी ॥ देव दुंदुभी वाजविती गगनीं ॥ आला [12]चापपाणी सिद्धाश्रमा ॥ ३५ ॥ जैसे [13]वर्षाकाळीं गंगेचे पूर ॥ तैसे चहूंकडून धांवती ऋषीश्वर ॥ समस्तांसी वंदोनि रघुवीर ॥ भेटता जाहला ते काळीं ॥ ३६ ॥ यज्ञमंडप शास्त्रप्रमाण ॥ कुंड वेदिका भूमि साधोन ॥ चारही द्वारें अष्टकोन ॥ करिती साधून [14]विप्र तेव्हां ॥ ३७ ॥ सकळ सामग्री सिद्ध करून ॥ आरंभिला महायज्ञ ॥ श्रीरामासी म्हणे [15]गाधिनंदन ॥ मखरक्षण करीं आतां ॥ ३८ ॥ तुवां ताटिका वधिली हा समाचार ॥ ऐकोन धांवतील रजनीचर ॥ मारीच सुबाहु भयंकर ॥ प्रळय थोर करितील ॥ ३९ ॥ यालागीं नरवीरपंचानना ॥ सांभाळीं चहूंकडे रघुनंदना ॥ परम कपटी राक्षस जाणा ॥ पर्वतशिळा टाकितील ॥ ४० ॥ श्रीराम म्हणे महाऋषी ॥ तुम्हीं चिंता न करावी मानसीं ॥ शिक्षा लावीन [16]कृतांतासी ॥ विघ्नें करूं आलिया ॥ ४१ ॥ ऐकोनि श्रीरामाचें वचन ॥ उल्हासलें ऋषीचें मन ॥ मग [17]दीक्षाग्रहणें [15]गाधिनंदन ॥ आरंभ करी यज्ञासी ॥ ४२ ॥ जैसा चंद्र वेष्टित [18]तारागणें ॥ कीं मित्राभोंवतीं जैसीं किरणें ॥ तैसा ऋषिवेष्टित गाधिनंदन ॥

१ ओळीनें. २ रक्तानें. ३ जटाकलाप. ४ सरसावली. ५ रेलचेल. ६ धनुष्याची. ७ सूर्य. ८ रात्रीच्या शेवटीं. ९ धनुष्याची दोरी. १० कानापर्यंत. ११ पृथ्वी. १२ श्रीराम. १३ पावसाळ्यांत. १४ ब्राह्मण. १५ विश्वामित्र. १६ काळास. १७ यज्ञकंकण बांधून. १८ नक्षत्रसमूहानें.

कुंडासमीप विराजे ॥ ४३ ॥ ओंकारासहित स्वाहाकार ॥ अवदानें टाकिती सत्वर ॥ उठला मंत्रांचा गजर ॥ वषट्कारघोष पैं ॥४४॥ तों अस्ता गेला वासरमणी ॥ दोन प्रहर जाहली रजनी ॥ पिशिताशन आले धांवोनी ॥ ताटिकेच्या कैवारें ॥ ४५ ॥ वीस कोटी रजनीचर ॥ मुख्य मारीच सुबाहु असुर ॥ सिद्धाश्रमासमीप सत्वर ॥ हांक फोडीत पातले ॥ ४६ ॥ हांक ऐकोनि दारुण ॥ भयभीत जाहले ब्राह्मण ॥ गळती हातींचीं अवदानें ॥ वदनीं बोबडी वळतसे ॥ ४७ ॥ म्हणती रक्षीं रक्षीं रघुनंदना ॥ नरवीरश्रेष्ठा गोविप्र-पाळणा ॥ श्रीराम म्हणे वो ब्राह्मणा ॥ चिंता कांहीं न करावी ॥ ४८ ॥ तंव एक म्हणे ब्राह्मण ॥ रक्षणार राम आणि लक्ष्मण ॥ पर्वता-कार राक्षस संपूर्ण ॥ वीस कोटी पातले ॥ ४९ ॥ एक द्वार हे दोघे रक्षिती ॥ दुज्या द्वारें राक्षस संचरती ॥ आतां कैसी होईल गती ॥ पळावया निश्चितीं ठाव नाहीं ॥ ५० ॥ विश्वामित्र म्हणे स्वस्थ करा मन ॥ मानव नव्हे रघुनंदन ॥ पुराणपुरुष आदिनारा-यण ॥ राक्षस वधावया अवतरला ॥ ५१ ॥ तों पर्वत आणि पाषाण ॥ यज्ञमंडपावरी पडती येऊन ॥ हांक फोडिती दारुण ॥ मग रघुनंदन काय करी ॥ ५२ ॥ कोदंड ओढून आकर्ण ॥ सोडी बाणांपाठीं बाण ॥ राक्षसांचीं शिरें कर चरण ॥ तटतटां तुटताती ॥५३॥ राक्षस परम अतुर्बळी ॥ ज्यांहीं सुरांचे मुकुट पाडिले तळीं ॥ हांक देती अंतराळीं ॥ यज्ञमंडप वेढिला ॥ ५४ ॥ एक उडती अंबरीं ॥ प्रेतें टाकिती यज्ञकुंडावरी ॥ मग रघूत्तम अयोध्याविहारी ॥ सर्वद्वारीं व्यापला ॥ ५५ ॥ जिकडे तिकडे रघुनंदन ॥ चारही द्वारें अष्ट-कोन ॥ अष्टदिशा व्यापोन ॥ सोडी बाण श्रीराम ॥ ५६ ॥ मंडपाचिया कळसावरी ॥ उभा राम कोदंडधारी ॥ बाणांचा पर्जन्य तये अवसरीं ॥ चहूंकडोनि पाडीतसे ॥ ५७ ॥ रामरूपें असंख्यात ॥ यागमंडपाभोंवतीं वेष्टित ॥ बाणांचे पूर वर्षत ॥ संहार होत असुरांचा ॥ ५८ ॥ मंडपावर आणि खालतें ॥ सर्व व्यापिलें रघुनाथें ॥ तीळ ठेवावयापुरतें ॥ रामाविण रितें स्थळ नसे ॥ ५९ ॥ तूणीरांतूनि किती निघती शर ॥ शेषासी त्याचा न कळे पार ॥ कीं लेखकापासूनि अक्षरें ॥ किती निघती कळेना ॥ ६० ॥ कीं मुखांतूनि शब्द निघती ॥ त्यांची जैसी न होय गणती ॥ कीं मेघधारा वर्षती ॥ नाहीं गणती तयांची ॥ ६१ ॥ कीं महाकवींची पद्यरचना ॥ किती जाहली हें कळेना ॥ कीं कुबेरभांडारींची गणना ॥ कदा न कळे कोणातें ॥ ६२ ॥ मेरुपाठारीं रत्नखाणी निश्चितीं ॥ त्यांतून रत्नें जैसीं निघती ॥ कीं पृथ्वीवरी तृणांकुर किती ॥ नाहीं गणती तयांची ॥ ६३ ॥ कीं शास्त्रसंमतें अनेकार्थ ॥ असंख्य करिती निपुण पंडित ॥ तैसा रामबाणांसी नाहीं अंत ॥ तूणीर निश्चित रिता नोहे ॥ ६४ ॥ मेघ समुद्रजळ प्राशितां ॥ परी तो रिता नोहे तत्त्वतां ॥ कीं विष्णुमहिमा वर्णितां ॥ न सरे सर्वथा कल्पांतीं ॥ ६५ ॥ तैसा उणा नोहेचि तूणीर ॥ कोट्यनुकोटी निघती शर ॥ करील राक्ष-सांचा संहार ॥ समरधीर श्रीराम ॥ ६६ ॥ जैसी जाहलिया प्रभात ॥ वृक्षींहूनि पक्षी उडती बहुत ॥ तैसीं राक्षसशिरें अकस्मात ॥

१ आहुत्या. २ सूर्य. ३ राक्षस. ४ तोंडांत. ५ शिरतात. ६ ठिकाण. ७ भयंकर. ८ अतिबलाढ्य. ९ अयोध्येंत राहणारा. १० पुष्कळ अर्थ. ११ भाता. १२ सकाळ.

आकाशपंथें उसळती ॥ ६७ ॥ वीस कोटी राक्षस देख ॥ एकला राम अयोध्यानायक ॥ परी ते मृगेंद्रावरी जंबुक ॥ अपार जैसे उठावले ॥ ६८ ॥ दंदशूक मिळोनि अपार ॥ धरूं आले खगेश्वर ॥ कीं प्रळयाग्नीवरी पतंगभार ॥ विझवावया झेंपावती ॥ ६९ ॥ कीं बहुत मिळून खद्योत ॥ धरून आणूं म्हणती आदित्य ॥ कीं शैलभ मिळोनि समस्त ॥ महामेरु उचलूं म्हणती ॥ ७० ॥ एकलाचि फरशधर ॥ परी अवनी केली निर्वीर ॥ एकले नृसिंहें संभार ॥ आटिले पूर्वीं दैत्यांचे ॥ ७१ ॥ असो राक्षसशिरांच्या लाखोल्या ॥ रामें भूलिंगासी समर्पिल्या ॥ मारीच सुबाहु ते वेळां ॥ गदा घेऊन धांविन्नले ॥ ७२ ॥ रामें काढिला निर्वाणबाण ॥ ज्या शरमुखीं दैवत सूर्यनारायण ॥ सुबाहूचा कंठ लक्षून ॥ केलें संधान राघवें ॥ ७३ ॥ जैसा विहंगम वेगेंकरून ॥ धांवे वृक्षाग्रींचें फळ लक्षून ॥ तैसा सवेग गेला बाण ॥ शिर उडविलें सुबाहूचें ॥ ७४ ॥ त्या बाणाचा पिसारा किंचित ॥ मारीचास लागला अकस्मात ॥ त्या शरवातें अद्भुत ॥ मारीच उडोनि गेला पैं ॥ ७५ ॥ कीं खगेश्वराच्या पक्षफडत्कारीं ॥ अचळ उडोनि जाय दिगंतरीं ॥ तैसा मारीच समुद्राभीतरी ॥ जाऊनियां पडियेला ॥ ७६ ॥ परम होऊनियां भ्रमित ॥ लंकेसी गेला धाकें पळत ॥ वाटे पाठीसी लागला रघुनाथ ॥ परतोनि पहात घडीघडी ॥ ७७ ॥ लंकेंत राक्षस प्रवेशोन ॥ राक्षसेंद्रातें सांगे वर्तमान ॥ म्हणे मानव नव्हे रघुनंदन ॥ आदिपुरुष अवतरला ॥ ७८ ॥ अवघा ऐकोन वृत्तांत ॥ रावण दचकला मनांत ॥ जैसा सुपर्णाचा ऐकतां पुरुषार्थ ॥ सर्प बहुत संतापती ॥ ७९ ॥ कीं ऐकोन संतांचें स्तवन ॥ मनांत कष्टी होय दुर्जन ॥ कीं पतिव्रतेचा धर्म परिसोन ॥ व्यभिचारिणी विटती पैं ॥ ८० ॥ असो समस्त आटोनि रजनीचर ॥ सिद्धाश्रमीं रणरंगधीर ॥ रणमंडळीं रघुवीर ॥ एकला कैसा शोभला ॥ ८१ ॥ जैसें महाकल्पीं सर्व संहारे ॥ मग एकलें परब्रह्म उरे ॥ कीं समस्त लोपोनि नक्षत्रें ॥ एकला दिनकर उगवे जैसा ॥ ८२ ॥ कीं शुंक्तिकेवेगळें मुक्ताफळ ॥ दिसे जैसें परम तेजाळ ॥ कीं प्रपंच त्यागोनि निर्मळ ॥ योगेश्वर विलसे जेवीं ॥ ८३ ॥ जैसे रात्र निरसतां उठती जन ॥ तैसे यज्ञमंडपांतूनि उठती ब्राह्मण ॥ भेटती रामास जाऊन ॥ ब्रह्मानंदेंकरोनियां ॥ ८४ ॥ जठरीं अन्नपाक होय वेगें ॥ परी गर्भास ढका न लागे ॥ कीं ज्ञानी वेष्टित तापत्रयभोगें ॥ परी अंतर न भंगे सर्वथा ॥ ८५ ॥ तैसे यज्ञमंडपासहित विप्र ॥ रघूत्तमें रक्षिले साचार ॥ पूर्ण जाहला मख समग्र ॥ श्रीरघुवीरप्रतापें ॥ ८६ ॥ विश्वामित्रासी नावरे प्रेमा ॥ म्हणे वत्सा माझिया श्रीरामा ॥ सहस्रवदनास तुझा महिमा ॥ न वर्णवेचि सर्वथा ॥ ८७ ॥ कौशिकासी म्हणती ऋषिजन ॥ श्रीराममूर्ति धाकुटी सगुण ॥ पर्वताकार राक्षस संहारून ॥ कैसे क्षणमात्रें टाकिले ॥ ८८ ॥ विश्वामित्र हास्यवदन ॥ ऋषींप्रति बोले वचन ॥ म्हणे आदित्यमंडळ दिसे लहान ॥ परी पृथ्वीभरी प्रकाश ॥ ८९ ॥ धाकुटा दिसे कलशोद्भव ॥ उदरीं सांठविला जलार्णव ॥ कीं वामनरूप धरी केशव ॥ परी दोन पाउलें ब्रह्मांड केलें ॥ ९० ॥ दिसे इंद्राचें वज्र

१ सिंहावर. २ कोल्हे. ३ सर्प. ४ गरुड. ५ टोळ. ६ पक्षी. ७ रावणाला. ८ ऐकून. ९ सूर्य. १० शिंपल्याशिवाय. ११ मोतीं. १२ संपतां. १३ शेषाला. १४ मारून.

लहान ॥ परी पर्वताचें केलें चूर्ण ॥ पंडितहृदयीं बुद्धि [1]सर्षपप्रमाण ॥ परी आब्रह्मभुवन व्यापिलें ॥ ९१ ॥ तैसा राम धाकुटा दिसे
तुम्हां ॥ परी ब्रह्मादिकां नेणवे महिमा ॥ पुराणपुरुष हा परमात्मा ॥ भक्तरक्षणा अवतरला ॥ ९२ ॥ असो [2]भूतावळी पातल्या तेथें ॥
त्यांहीं भक्षिलीं राक्षसप्रेतें ॥ यज्ञमंडपाभोंवतें ॥ शुद्ध केलें [3]भूमंडळ ॥ ९३ ॥ तों आलें मिथिलेश्वराचें पत्र ॥ तें स्वयें वाची विश्वामित्र ॥
सवें घेऊन समस्त विप्र ॥ स्वयंवरालागीं येइंजे ॥ ९४ ॥ ते दिवशीं बहुत सोहळा ॥ सिद्धाश्रमीं [4]कौशिकें केला ॥ ब्राह्मणभोजन
जाहलिया सकळां ॥ वस्त्रें अलंकार दीधले ॥ ९५ ॥ जेथें साह्य श्रीराम आपण ॥ तेथें कांहीं न दिसे अपूर्ण ॥ बहुत दक्षिणा देऊनि
ब्राह्मण ॥ विश्वामित्रें तोषविले ॥ ९६ ॥ असो तेव्हां जाहलिया [5]रंजनी ॥ कौशिक निजला स्वशयनीं ॥ पुढें रामलक्ष्मण घेउनी ॥
सुखेंकरून पहुडला ॥ ९७ ॥ साक्षात् शेषनारायण ॥ कौशिक निजला पुढें घेऊन ॥ निद्रा नव्हे ते समाधि पूर्ण ॥ [6]उन्मनी ओंवा-
ळून टाकावी ॥ ९८ ॥ हृदयीं न धरितां रघुनाथा ॥ शेजे निजती जे तत्त्वतां ॥ मज गमे ऐसें पाहतां ॥ कीं पशूच केवळ पडियेले
॥ ९९ ॥ रामस्मरणेंविण भोजन ॥ जैसें भस्मीं घातलें [7]अवदान ॥ तें यज्ञपुरुषासी न अर्पण ॥ वृथा भोजन तैसें तें ॥ १०० ॥ राम-
प्राप्तीविण कर्म देख ॥ नाशिती [8]कुश मृत्तिका उदक ॥ तरी ते पिशाच नर ओळख ॥ भुलले मूर्ख जाणिजे ॥ १ ॥ श्रीरामप्राप्तीविण
ज्ञान ॥ त्याचें नांव म्हणिजे अज्ञान ॥ विद्या तेचि अविद्या पूर्ण ॥ धर्म तो अधर्म जाणिजे ॥ २ ॥ असो धन्य भाग्य कौशिकाचें ॥
पुढें [9]निधान श्रीवैकुंठींचें ॥ घेऊन पहुडला साचें ॥ नाहीं चिंतेचें वास्तव्य ॥ ३ ॥ निद्रा लागली जों ऋषीस निश्चितीं ॥ तों जागे
जाहले दोघे दाशरथी ॥ श्रीराम म्हणे सौमित्राप्रती ॥ [10]परियेसीं एक जिवलगा ॥ ४ ॥ आम्ही कधीं जाऊं अयोध्येसी ॥ पाहूं दश-
रथाचा वदनशशी ॥ बोलतां श्रीरामाचे नेत्रांसी ॥ अश्रु आले तेधवां ॥ ५ ॥ तों शयनीं जागा जाहला गाधिसुत ॥ दोघांच्या ऐशा
गोष्टी ऐकत ॥ स्फुंदस्फुंदोनि बोले रघुनाथ ॥ श्रीदशरथ देखों कधीं ॥ ६ ॥ सकळ रायांचे मुगुट एकसरीं ॥ नमस्कारिती ते अवसरीं ॥
पडती दशरथाचे [11]प्रपदावरी ॥ [12]किणीं पडलीं चरणीं तेणें ॥ ७ ॥ ते चरण मी कधीं देखेन ॥ दशरथाच्या पादुका घेऊन ॥ दिव्यरत्नीं
मंडित पूर्ण ॥ मी उभा ठाकेन कधीं पुढें ॥ ८ ॥ जे अयोध्याप्रभूची पट्टराणी ॥ कौसल्या आमुची जननी ॥ ते अत्यंत कृश
होउनी ॥ वाट पाहत असेल कीं ॥ ९ ॥ ऐसें विश्वामित्रें ऐकिलें ॥ उठोनि रामासी हृदयीं धरिलें ॥ म्हणे बा रे जनकाचें पत्र आलें ॥
उदयीं जाऊं मिथिलेसी ॥ ११० ॥ तेथें केवळ विजयश्री सीता ॥ ते तुज माळ घालील रघुनाथा ॥ कौसल्येसहित दशरथा ॥ तेथेंचि
तुज भेटवीन ॥ ११ ॥ तूं जगद्गुरु श्रीरामचंद्र ॥ दाविसी लौकिक लीलाचरित्र ॥ असो उदयाचळीं प्रकटलें रविचक्र ॥ विप्र सारिती
नित्यनेम ॥ १२ ॥ घेऊन ऋषीश्वरांचे संभार ॥ श्रीराम आणि सौमित्र ॥ निघता जाहला विश्वामित्र ॥ मिथिलापंथें ते काळीं ॥ १३ ॥

---

१ मोहरीएवढी. २ भूतें. ३ जमीन. ४ विश्वामित्रानें. ५ रात्र. ६ पांचवी अवस्था. ७ आहुति. ८ दर्भ. ९ रत्न. १० ऐक. ११ पादाग्रावर. १२ घट्टे.

चरणचालीं ऋषी चालती ॥ म्हणोनि रथ टाकोनि रघुपती ॥ चरणीं चालतां हो जगती ॥ धन्य जाहलें म्हणतसे ॥ १४ ॥ दोन्ही बाहीं विश्वामित्र आणि सौमित्र ॥ मध्यें जगद्वंद्य [1]राजीवनेत्र ॥ तो घनश्याम चारुगात्र ॥ कैसा शोभला ते काळीं ॥ १५ ॥ पूर्वीं [2]मंथावया क्षीरसागर ॥ निघाला जेव्हां क्षीराब्धिजावर ॥ ते वेळीं [3]कमलोद्भव आणि उमावर ॥ दोन्ही भागीं शोभले जेवीं ॥ १६ ॥ कीं शशिमंडळा दोहींकडे लखलखित ॥ शोभती भृगुतनय अंगिरासुत ॥ कीं शंख चक्र विराजत ॥ श्रीविष्णूच्या दोन्ही भागीं ॥ १७ ॥ असो ऐसा चालतां रघुनाथ ॥ ऋषी आपुलाले आश्रम दावित ॥ ठायीं ठायीं बैसवूनि रघुनाथ ॥ पूजा करिती आदरें ॥ १८ ॥ समस्तांचा करीत उद्धार ॥ पुढें चालत जगदुद्धार ॥ तों पुढें प्रचंड शिळा दुर्धर ॥ दृष्टीं देखिली राघवें ॥ १९ ॥ तों श्रीरामचरणरज ते वेळे ॥ वायुसंगें पुढें धांविन्नले ॥ शिळेवरी जाऊन पडले ॥ नवल वर्तलें अद्भुत ॥ १२० ॥ अहल्येसी लाविला चरण ॥ ऐसी कथा वर्णिती कविजन ॥ तरी अहल्या ब्रह्मकन्या पूर्ण ॥ गौतमाची निजपत्नी ॥ २१ ॥ ब्राह्मणपत्नी ते महासती ॥ तियेतें पाय लावील रघुपती ॥ हें न घडे कल्पांतीं ॥ बरवें संतीं विचारिजे ॥ २२ ॥ असो चरणरजेंचि ते वेळां ॥ कांपों लागली प्रचंड शिळा ॥ विश्वामित्राप्रति [4]घनसांवळा ॥ पुसता जाहला वृत्तांत ॥ २३ ॥ म्हणे ऋषि हें नवल वर्तत ॥ थरथरां शिळा कांपत ॥ जैसा चंद्रोदय हळुहळू होत ॥ तैसें दिव्य रूप दिसत स्त्रियेचें ॥ २४ ॥ परम शोभती [5]विद्रुमाधर ॥ जे [6]चंपकवर्ण सुकुमार ॥ उर्वशी रंभा म्हणती सुंदर ॥ परी इजवरोनि ओंवाळिजे ॥ २५ ॥ मस्तकींचे रुळती [7]कबरीभार ॥ वल्कलें वेष्टित सुंदर ॥ मज वाटतें इंद्रादि सुरवर ॥ इचे पोटीं जन्मले ॥ २६ ॥ कीं हे आदिभवानी साचार ॥ आम्हांस आली हो समोर ॥ कीं हे कोणी ऋषिपत्नी सुंदर ॥ निद्रा घेऊन उठली पैं ॥ २७ ॥ कीं पडली होती मूर्च्छा येउनी ॥ कीं निघाली पाताळाहुनी ॥ कोणीं टाकिली वधोनी ॥ प्राण येऊन उठली आतां ॥ २८ ॥ कीं कोणीं केलें शासन ॥ बैसली होती रुसोन ॥ कीं तुमची तपश्चर्या संपूर्ण ॥ येणें रूपें आकारली ॥ २९ ॥ मग विश्वामित्र म्हणे राजीवनेत्रा ॥ हे ब्रह्मकन्या परम पवित्रा ॥ पतीनें शापितां [8]मदनारिमित्रा ॥ शिळारूप जाहली हे ॥ १३० ॥ श्रीराम म्हणे महाऋषी ॥ अहल्या शिळा जाहली कैसी ॥ तो वृत्तांत मजपाशीं ॥ कृपा करोनि सांगिजे ॥ ३१ ॥ ऋषि म्हणे विरिंचीनें ब्रह्मांड रचिलें ॥ चित्र विचित्ररूप विस्तारिलें ॥ सकळांमाजी विशेष केलें ॥ अहल्येचें स्वरूप पैं ॥ ३२ ॥ देखोन परम सुंदर ॥ तीस मागों येती बहुत वर ॥ कमलोद्भवासी पडला विचार ॥ स्वयंवर थोर मांडिलें ॥ ३३ ॥ ब्रह्मा बोले मानसींचा पण ॥ दों प्रहरांत पृथ्वीची प्रदक्षिण ॥ करून येईल पुढें पूर्ण ॥ त्यासी देईन हे अहल्या ॥ ३४ ॥ ऐकोनि ऐसिया पणासी ॥ धांवों लागले देव ऋषी ॥ यक्ष गंधर्व तापसी ॥ पृथ्वीप्रदक्षिणेसी चालिले ॥ ३५ ॥ यांत अवघ्यांपुढें अमरपती ॥ ऐरावतारूढ धांवे शीघ्रगती ॥ इतर लोकपाळही धांवती ॥ वाहनीं बैसोनि आपुलाल्या ॥ ३६ ॥

---

१ कमळनयन. २ घुसळावयास. ३ ब्रह्मदेव. ४ श्रीराम. ५ पोंवळ्यासारखे ओंठ. ६ चांफ्यासारखी. ७ केशकलाप. ८ श्रीरामा.

एक ऊर्ध्वपंथें वेगें जाती ॥ एक समीरगतीं धांवती ॥ एक मार्गीं अडखळून पडती ॥ सर्वेचि पळती उठोनियां ॥ ३७ ॥ तंव इकडे गौतम मुनी ॥ जान्हवीजीवनीं स्नान करूनी ॥ बाहेर येतां नयनीं ॥ [1]द्विमुखी कपिला देखिली ॥ ३८ ॥ तंव गायत्रीमंत्र जपोन ॥ विधियुक्त केल्या प्रदक्षिणा तीन ॥ नित्यकर्म अनुष्ठान ॥ गौतमें केलें सावकाश ॥ ३९ ॥ सत्यलोकास आला परतोन ॥ ज्ञानीं पाहें [2]कमलासन ॥ तों पृथ्वीप्रदक्षिणा तीन ॥ करून आला गौतम मुनी ॥ १४० ॥ [2]विधि म्हणे धन्य जाहलें ॥ अहल्येचें भाग्य फळासी आलें ॥ तत्काळ दोघांसी लग्न लाविलें ॥ यथाविधि पाणिग्रहण ॥ ४१ ॥ तों अवघियांपुढें [3]अमरपती ॥ धांवत आला शीघ्रगती ॥ वधूवरें देखोनि चित्तीं ॥ परम क्रोध संचरला ॥ ४२ ॥ विरिंचीस म्हणे सहस्रनयन ॥ वृद्धास केलें कन्यादान ॥ तूं असत्यनाथ पूर्ण ॥ कळों आलें येथोनि आम्हां ॥ ४३ ॥ स्रष्टा म्हणे [3]वज्रधरासी ॥ मज असत्य तूं किमर्थ म्हणसी ॥ येणें तीन प्रदक्षिणा केल्या पृथ्वीसी ॥ पाहें मानसीं विचारूनी ॥ ४४ ॥ विचार न करितां बोले वचन ॥ सज्जनासी ठेवी नसतें दूषण ॥ वेदवाणी मानी अप्रमाण ॥ शतमूर्खांहूनि मूर्ख तो ॥ ४५ ॥ असो इंद्रें द्वेष धरोनि मानसीं ॥ म्हणे एक वेळ भोगीन अहल्येसी ॥ परतोन गेला स्वस्थानासी ॥ खेद अत्यंत पावोनियां ॥ ४६ ॥ घेऊनियां अहल्येसी ॥ गौतम आला निजाश्रमासी ॥ बहुत क्रमिलें कालासी ॥ परी इंद्र अहर्निशीं जपतसे ॥ ४७ ॥ तंव आलें सूर्यग्रहण ॥ गौतम अहल्या स्नान करून ॥ ऋषि ध्यानीं बैसला तल्लीन ॥ अहल्या परतोन घरा आली ॥ ४८ ॥ [4]ब्रह्मकन्या एकली गृहांत ॥ जाणोनि शक्र आला धांवत ॥ गौतमाचा वेष धरीत ॥ सतीलागीं भोगावया ॥ ४९ ॥ [5]कपाट देवोनं गृहांतरीं ॥ आंत बैसली [4]ब्रह्मकुमारी ॥ तों हा कपटवेषधारी ॥ येऊन द्वारीं उभा ठाके ॥ १५० ॥ म्हणे अहल्ये धांव धांव झडकरी ॥ म्हणोन आंग टाकिलें धरणीवरी ॥ येरी धांवोन आली द्वारीं ॥ हृदयीं धरी तयातें ॥ ५१ ॥ कापट्य नेणे महासती ॥ हृदयीं निर्मळ जैसी भागीरथी ॥ परम खेद करी चित्तीं ॥ नयनीं वाहत अश्रुपात ॥ ५२ ॥ अहल्येनें वेगें उचलिला ॥ नेऊन [6]मंचकावरी पहुडविला ॥ म्हणे प्रिये प्राण चालिला ॥ अंगसंग देईं वेगें ॥ ५३ ॥ येरी म्हणे स्वामी आजि ग्रहण ॥ माध्यान्हास आला [7]चंडकिरण ॥ महाराज तुम्ही शास्त्रज्ञ पूर्ण ॥ विचारून पाहावें ॥ ५४ ॥ येरू म्हणे तुज शास्त्रासीं काय कारण ॥ माझें वचन तुज प्रमाण ॥ तंव ते सतीशिरोरत्न ॥ अवश्य म्हणे ते काळीं ॥ ५५ ॥ अहल्या इंद्र दोघांजणीं ॥ शयन केलें एके शयनीं ॥ तंव गौतम नित्यनेम सारूनी ॥ आश्रमासी पातला ॥ ५६ ॥ म्हणे अहल्ये उघडीं वो द्वार ॥ येरी घाबरी सांवरी वस्त्र ॥ म्हणे तूं कोण रे दुराचार ॥ तो म्हणे [3]अमरेंद्र जाण मी ॥ ५७ ॥ म्हणे रे अपवित्रा काय केलें ॥ [8]श्रोत्रियाचें पात्र कां स्पर्शिलें ॥ तुझें थोरपण दग्ध जाहलें ॥ कर्म केलें विपरीत ॥ ५८ ॥ रति जाहली कीं परिपूर्ण ॥ वेगीं जाय तूं येथून ॥ मग अहल्या कपाट उघडी धांवोन ॥

---

१ प्रसूत होत असतां वत्साचें मुख दिसत आहे अशी काळी गाय. २ ब्रह्मदेव. ३ इंद्र. ४ अहल्या. ५ दार लावून. ६ पलंगावर. ७ सूर्य. ८ वेदवेत्त्या ब्राह्मणाचें.

तंव गौतम दृष्टीं देखिला ॥ ५९ ॥ अहल्येस ऋषि कैसा भासला ॥ कीं कल्पांतींचा सूर्य प्रगटला ॥ कीं अपर्णावर कोपला ॥ तृतीय नेत्र उघडोनियां ॥ १६० ॥ तों इंद्र पळतां शापिला वेगें ॥ तुझे अंगीं होतील सहस्र भगें ॥ नपुंसक होऊन वागें ॥ परदारिया पतिता तूं ॥ ६१ ॥ तंव ते अहल्या कामिनी ॥ थरथरां कांपे ऋषीस देखोनी ॥ जैसी महावातें कमळिणी ॥ उलथोन पडों पाहे कीं ॥ ६२ ॥ ग्रहणीं काळवंडे वासरमणी ॥ तैसी मुखींची कळा गेली उतरोनी ॥ परम कोपायमान मुनी ॥ अहल्येसी शापीत ॥ ६३ ॥ हो तुझें शरीर शिळावत ॥ जड होऊन पडो अरण्यांत ॥ साठ सहस्रवर्षेंपर्यंत ॥ राहें मूर्च्छित होऊनियां ॥ ६४ ॥ शाप ऐकतांच लवलाहें ॥ धांवोनि धरी ऋषीचे पाये ॥ म्हणे महाराजा विचारूनि पाहें ॥ कापट्य केलें चांडाळें ॥ ६५ ॥ जाणोनियां पाकशासन ॥ जरी म्यां दिधलें असेल भोगदान ॥ तरी माझें शरीर हो शतचूर्ण ॥ ठकविलें पूर्ण पतितानें ॥ ६६ ॥ ऋषी म्हणे तुवां जाणोन ॥ शापिला नाहीं पाकशासन ॥ रति झाली कीं परिपूर्ण ॥ जाय म्हणोन बोललीस ॥ ६७ ॥ येरी म्हणे नेणोनि घडलें पाप ॥ मज उपजला पश्चात्ताप ॥ तपोनिधि पुण्यरूप ॥ देईं उश्शाप सर्वथा ॥ ६८ ॥ अहल्या परम दीनवदन ॥ नेत्रीं वाहे अश्रुजीवन ॥ द्रवलें गौतमाचें मन ॥ काय वचन बोलिला ॥ ६९ ॥ म्हणे रविकुळीं अवतरेल नारायण ॥ कौसल्यात्मज रघुनंदन ॥ त्याच्या पदरजप्रतापेंकरून ॥ उद्धरोन मज पावसी ॥ १७० ॥ आतां होईं तूं चंडशिळा ॥ जड पाषाण परम सबळा ॥ वचन ऐकतांचि तत्काळा ॥ अहल्या मूर्च्छित पडियेली ॥ ७१ ॥ शरीर पडलें अचेतन ॥ अंग सर्व जाहलें पाषाण ॥ केश नेत्र नासिका स्तन ॥ जाहलें कठिनरूप तेव्हां ॥ ७२ ॥ प्राण गोळा होऊनि समस्त ॥ आकर्षोनि राहिली गुप्त ॥ गौतम आपुले दृष्टीं पाहत ॥ पाषाणवत अहल्या ॥ ७३ ॥ मग आठवूनि अहल्येचे गुण ॥ गौतमासी आलें रुदन ॥ म्हणे अहल्येऐसें गुणनिधान ॥ कैसें टाकून जाऊं मी ॥ ७४ ॥ तीस नेणोन घडलें पाप ॥ म्यां तर दिधला दीर्घ शाप ॥ आतां करावया जाईन तप ॥ इजसमीप कोणी नाहीं ॥ ७५ ॥ येथें सर्प व्याघ्रादि जीवजाती ॥ ईस शिळा देखोन पीडा करिती ॥ चंपककळिका अहल्या सती ॥ परम खेद पावेल ॥ ७६ ॥ मग ऋषि शाप देत वनासी ॥ जे जीवमात्र येतील अहल्येपाशीं ॥ ते गतप्राण होतील निश्चयेंसीं ॥ कोणीं शिळेसी न पाहावें ॥ ७७ ॥ ऐसें ऐकतां शापवचन ॥ एक वृक्ष वेगळे करून ॥ पिपीलिकादि गज व्याघ्र संपूर्ण ॥ गेले पळून ते काळीं ॥ ७८ ॥ मग महाऋषि गौतम ॥ सतीचा खेद करी परम ॥ पावला तो बद्रिकाश्रम ॥ अनुष्ठान करीत बैसला ॥ ७९ ॥ म्हणे कामें नाडिला पाकशासन ॥ मज क्रोधें नागविलें पूर्ण ॥ इंद्र अहल्येसी शापितां जाण ॥ तपक्षय जाहला ॥ १८० ॥ इकडे मयूर होऊन अरण्यांत ॥ अनुतापें हिंडे रुदन करीत ॥ मग समस्त देवीं अमरनाथ ॥ गौतमापाशीं आणिला ॥ ८१ ॥ सुरवरीं बहुत प्रार्थून ॥ केलें इंद्राचें शापमोचन ॥ गौतम बोले प्रसन्नवदन ॥ सहस्र-

१ प्रळयींचा. २ शंकर. ३ काळा होतो. ४ सूर्य. ५ इंद्र. ६ कोणतेही प्राणी. ७ मरतील. ८ मुंग्या वगैरे.

नयन तूं होशील ॥ ८२ ॥ शक्र सहस्रनेत्र जाहला ॥ निजपदा तत्काळ पावला ॥ तैंपासोन हे अहल्या शिळा ॥ आजवरी जाहली होती ॥ ८३ ॥ रामा तुझे पडतां [1]चरणरज ॥ अहल्या दिव्यरूप जाहली सहज ॥ श्रीरामा पहावया तुज ॥ सजीव सतेज जाहली ॥ ८४ ॥ [2]कौशिकें सांगतां हें पूर्वकथन ॥ आश्चर्य करी रघुनंदन ॥ [2]कौशिकासी प्रतिवचन ॥ काय बोलता जाहला ॥ ८५ ॥ म्यां काय केलें असे आचरण ॥ माझ्या पदरजें उद्धरे पाषाण ॥ कौशिक म्हणे तुझे चरण ॥ त्यांचें वैभव रामा हें ॥ ८६ ॥ असो रघुवीर तये काळीं ॥ ऋषिसहित आला तियेजवळी ॥ पदर सांवरूनि उठली ॥ अहल्यादेवी तेधवां ॥ ८७ ॥ मस्तकींचे मोकळे [3]कैंबरी-भार ॥ सांवरोनि [4]वीरगुंठी बांधी सत्वर ॥ नेत्रीं न्याहाळित रघुवीर ॥ [5]विधिसुता समोर पातली ॥ ८८ ॥ जो दशरथाचा महत्पुण्य-मेरु ॥ जो कां लावण्यामृतसागरु ॥ जो जगद्वंद्य जगद्गुरु ॥ अहल्येनें देखिला ॥ ८९ ॥ जो मृडानीपतीचें हृदयरत्न ॥ जो इंद्रादि देवांचें देवतार्चन ॥ जो [6]जलजोद्भवाचें ध्येय पूर्ण ॥ नारदादिकांचें गुह्य जें ॥ १९० ॥ जे सनकादिकांची आराध्य मूर्ती ॥ [7]चारी [8]साही वर्णिती ज्याची कीर्ती ॥ तो नेत्रीं देखिला रघुपती ॥ प्रेम चित्तीं न समाये ॥ ९१ ॥ अष्टभावें दाटोन [6]ब्रह्मकन्या ॥ साष्टांग नमी राजीव-नयना ॥ तों श्रीराम बोले सुवचना ॥ माते ऊठ झडकरी ॥ ९२ ॥ ऐसें ऐकतां ते वेळीं ॥ कमलोद्भवकन्या ऊठली ॥ जैसी कोकिळा गर्जे वसंतकाळीं ॥ तैसी स्तवन करीतसे ॥ ९३ ॥ म्हणे जय जय रामा करुणासमुद्रा ॥ हे दाशरथे प्रतापरुद्रा ॥ हे जगद्गुरो श्रीराम-चंद्रा ॥ मज चकोरालागीं उदय तुझा ॥ ९४ ॥ हे राघवा पुराणपुरुषा ॥ हे जगत्पालका अनंतवेषा ॥ हे कौसल्यात्मजा चंडांशा ॥ निरसली निशा तव उदयीं ॥ ९५ ॥ हे [9]विद्वज्जनमानसमांदुसरत्ना ॥ हे ताटिकांतक नरवीरपंचानना ॥ तुझ्या नामप्रतापाची ऐकतां गर्जना ॥ [10]पांपवारणा संहार ॥ ९६ ॥ श्रीरामा तूं भवरोगवैद्य सुजाण ॥ मात्रा देऊन निजचरणरेण ॥ दोषक्षयरोग दवडोन ॥ अक्षय केलें मजलागीं ॥ ९७ ॥ साठ सहस्रवर्षेंपर्यंत ॥ अहंदेहभूतें झडपिलें यथार्थ ॥ तूं पंचाक्षरी रघुनाथ ॥ भूतें समस्त पळालीं ॥ ९८ ॥ साठ सहस्र वर्षेंवरी ॥ जळतां चिंतेच्या वणव्याभीतरी ॥ तूं मेघ वर्षतां झडकरी ॥ आजि पूर्ण निवाल्यें ॥ ९९ ॥ माझ्या कुरळकेशें-करून ॥ राघवा झाडीन तुझे चरण ॥ तुजवरून ओंवाळून ॥ काया टाकीन माझी हे ॥ २०० ॥ असो गौतम पाहे ज्ञानीं ॥ तों उद्ध-रली आपुली कामिनी ॥ तत्काळ उभा ठाकला येऊनी ॥ वंदी चापपाणी तयातें ॥ १ ॥ श्रीराम उगवतां दिनमणी ॥ हीं चक्रवाकें मिळालीं दोन्ही ॥ असो सकळ ऋषि मिळोनी ॥ [11]शेंस भरिती उभयतांची ॥ २ ॥ अहल्या म्हणे हो श्रीरामा ॥ तुज अनंत कल्याण हो सर्वोत्तमा ॥ [12]हिमनगजामातमनविश्रामा ॥ पूर्णब्रह्मा परात्परा ॥ ३ ॥ श्रीरामा सीता स्वयंवरीं ॥ तुजचि प्राप्त होईल ते नोवरी ॥

---

१ पायांना लागलेल्या धुळीचे कण. २ विश्वामित्रानें. ३ केशकलाप. ४ गांठ. ५ अहल्या. ६ ब्रह्मदेवाचें. ७ चार वेद. ८ सहा शास्त्रें. ९ विद्वानांच्या मनोरूपी पेटींतलें रत्न. १० पापरूप हत्तीचा. ११ मंगलतिलक करणें. १२ शिवाच्या मनाचें विश्रांतिस्थान अशा.

तुजवांचोनि आणिकास न वरी ॥ तुजचि वरी निर्धारें ॥ ४ ॥ अहल्या गौतम दोघांजणीं ॥ निजाश्रमीं पूजिला चापपाणी ॥ पुढें श्रीराम आज्ञा घेउनी ॥ मिथिलेजवळी पातले ॥ ५ ॥ शतानंद पुत्र अहल्येचा ॥ तो होय पुरोहित जनकाचा ॥ संग धरोनि श्रीरामाचा ॥ तोही निघाला ते वेळीं ॥ ६ ॥ मिथिलेबाहेर उपवनांत ॥ ऋषीसहित राहिला रघुनाथ ॥ तों नगरांतून आली मात ॥ स्वयंवरपणाची तेधवां ॥ ७ ॥ उमाकांताचें चाप दारुण ॥ त्यास जो बळिया वाहील गुण ॥ त्यास जानकीपाणिग्रहण ॥ हाचि पण स्वयंवरीं ॥ ८ ॥ श्रीराम म्हणे विश्वामित्रासी ॥ जानकी जन्म पावली कैसी ॥ पण केला धनुष्यासी ॥ तरी तें चाप कोणाचें ॥ ९ ॥ कौशिक[1] सांगे पूर्वकथन ॥ पूर्वीं राजा पद्माक्ष जाण ॥ तेणें कमला[2] करून प्रसन्न ॥ हेंचि वरदान मागीतलें ॥ २१० ॥ कीं माझी कन्या होऊन घरीं ॥ खेळें माझिये अंकावरी[3] ॥ मग ते वैकुंठपतीची[4] अंतुरी ॥ काय बोले तेधवां ॥ ११ ॥ मी येतां तुझिया मंदिरा ॥ बरें तुज नव्हे नृपवरा ॥ नसतीं विघ्नें येतील घरा ॥ विचार बरवा नव्हे हा ॥ १२ ॥ नृप म्हणे निश्चयें माझे अंतरीं ॥ माते तूं होय माझी कुमरी ॥ इंदिरा[2] म्हणे स्वामी मुरारी ॥ तया आधीन मी असें ॥ १३ ॥ मग प्रसन्न करून श्रीधर ॥ राजा पद्माक्ष मागे वर ॥ मज कन्या रमा देईं साचार ॥ ऐकतां मुरहर[4] हांसिन्नला ॥ १४ ॥ मग मातुलिंग[5] फळ दिधलें ॥ तें रायें घरीं नवमास ठेविलें ॥ त्यांतून कन्यारत्न निघालें ॥ तेज प्रकटलें असंभाव्य ॥ १५ ॥ वाढतां वाढतां जाहली उपवर ॥ तीस मागों येती बहुत वर ॥ पद्माक्षासी सुख अपार ॥ कन्या सुंदर देखोनि ॥ १६ ॥ ऋषिगण गंधर्व नृपवर ॥ यक्ष चारण विद्याधर ॥ एकवटले समग्र ॥ पद्माक्षाचे मंदिरीं ॥ १७ ॥ म्हणे पण करीं एक लागवेगीं ॥ कोप चढला पद्माक्षालागीं ॥ म्हणे नभसुनीळता[6] जयाचे अंगीं ॥ त्यास कन्या देईन हे ॥ १८ ॥ ऐकोनि सर्वही कोपले ॥ म्हणती काय रे मिथ्या बोले ॥ एकसरिसे वीर खवळले ॥ युद्ध मांडलें असंभाव्य ॥ १९ ॥ अवघ्यां राजयांसीं एकला ॥ पद्माक्ष सप्तदिन[7] भांडला ॥ शेवटीं सर्वीं मिळोनि मारिला ॥ पद्माक्षरावो रणामाजी ॥ २२० ॥ तों पद्माक्षी ते वेळीं ॥ अग्निकुंडीं गुप्त जाहली ॥ पद्माक्षाची संपदा[8] लुटिली ॥ ग्राम विध्वंसूनि सर्व गेले ॥ २१ ॥ तया ब्रह्मारण्यामाझारी ॥ पद्माक्षी निघाली कुंडाबाहेरी ॥ रावण विमानारूढ ते अवसरी ॥ लावण्यसुंदरी देखिली ॥ २२ ॥ देखोन सौंदर्यरूपडें ॥ रावणाची उडी पडे ॥ येरी यज्ञकुंडामाजी दडे ॥ रावणें कुंड विझविलें ॥ २३ ॥ तेथें खणितां बहुत यत्नें ॥ त्यासी सांपडलीं पांच रत्नें ॥ घरा आणिलीं दशाननें ॥ संदुकेमाजी[9] ठेविलीं ॥ २४ ॥ मग एकांतींचे अवसरीं ॥ रावण सांगे मंदोदरी ॥ अमोल रत्नें पृथ्वीवरी ॥ तुजलागीं सुंदरी आणिलीं ॥ २५ ॥ धांवोनि मंदोदरी उचली पेटी ॥ तंव न ढळेचि तिये गोरटी ॥ हांसोन दशवक्र[10] शेवटीं ॥ आपण उठे उचलावया ॥ २६ ॥ तंव ती न ढळेचि विसां करीं ॥ आश्चर्य झालें ते अवसरीं ॥ प्रधान

१ विश्वामित्र. २ लक्ष्मी. ३ मांडीवर. ४ विष्णु. ५ माहाळुंग. ६ आकाशासारखा वर्ण. ७ सातदिवस. ८ संपत्ती. ९ पेटींत. १० रावण.

आणि मंदोदरी ॥ पेटी उघडिती तेधवां ॥ २७ ॥ तंव [1]षण्मासांचें कन्यारत्न ॥ देखता होय दशानन ॥ मंदोदरी म्हणे हें विघ्न ॥ राया घरासी आणिलें ॥ २८ ॥ जो मायावरणावेगळा ॥ चैतन्यदेही घनसांवळा ॥ त्यासीच हे घालील माळा ॥ इतरां ज्वाळा अग्नीची हे ॥ २९ ॥ इनें [2]निर्दाळिला पद्माक्ष नृपवर ॥ बहुत रायांचा केला संहार ॥ ही येथें असतां साचार ॥ लंकापुर नुरेचि ॥ २३० ॥ दशानना हें परम विघ्न ॥ इजसी आधीं बाहेर घालीं नेऊन ॥ मग बोलाविले सेवकजन ॥ [3]संदुक मस्तकीं दीधली ॥ ३१ ॥ पेटी उचलिली ते अवसरीं ॥ हळूच आंतून शब्द करी ॥ मी आणिक येईन लंकापुरीं ॥ रावण सहपरिवारीं वधावया ॥ ३२ ॥ ऐकोनियां ऐसें वचन ॥ रावणाचें दचकलें मन ॥ म्हणे इचा आतां वध करीन ॥ [4]मयजा चरण धरी मग ॥ ३३ ॥ चरणीं दृढ ठेवोनि माथा ॥ म्हणे पुढील विघ्नें आतांचि कां आणितां ॥ मग शांत केलें [5]पौलस्तिसुता ॥ सकळीं मिळूनि तेधवां ॥ ३४ ॥ रावण सांगे सेवकांसी ॥ जनकराजा आहे मिथिलेसी ॥ त्याचिया गांवावरी हे [6]विवसी ॥ धाडी नेऊन घाला रे ॥ ३५ ॥ मग रातोरातीं तत्काळीं ॥ पेटी पुरिली मिथिलेजवळी ॥ तें शेत कोणे एके काळीं ॥ जनकें ब्राह्मणासी दीधलें ॥ ३६ ॥ पद्माक्ष नृप पूर्वींचा पूर्ण ॥ पुन्हां अवतरला तो ब्राह्मण ॥ रायें वेदवक्ता म्हणोन ॥ क्षेत्रदान दीधलें ॥ ३७ ॥ सुमुहूर्तें पाहोनि सुंदर ॥ ब्राह्मणें जुंपिला नांगर ॥ नांगरदांतीं परिकर ॥ पेटी अकस्मात लागली ॥ ३८ ॥ ब्राह्मण सत्य सन्मार्गी ॥ पेटी उचलिली लागवेगीं ॥ मग दाखविली जनकालागीं ॥ म्हणे राया ठेवणें घेईं आपुलें ॥ ३९ ॥ राव म्हणे काय आहे भीतरी ॥ विप्र म्हणे मी नेणें निर्धारीं ॥ जनकराजा आश्चर्य करी ॥ पेटी उघडिली तेधवां ॥ २४० ॥ भोंवते प्रधान पाहती सकळी ॥ तों पांच वर्षांची कन्या देखिली ॥ असंभाव्य प्रभा पडली ॥ आश्चर्य वाटलें सकळिकां ॥ ४१ ॥ जनकास उपजला स्नेहो ॥ म्हणे स्वामी हें कन्यारत्न मज द्या हो ॥ ब्राह्मण म्हणे महाबाहो ॥ तुझीच कन्या हे निर्धारें ॥ ४२ ॥ ऐसी ते जनकात्मजा सुंदर ॥ सकळ सौंदर्याचें माहेर ॥ जनकरायासी सुख अपार ॥ म्हणे इंदिरा साचार आली हे ॥ ४३ ॥ एकवीस वेळां निःक्षत्री ॥ परशुरामें केली धरित्री ॥ सहस्रार्जुन वधोनि क्षणमात्रीं ॥ सूड घेतला रेणुकेचा ॥ ४४ ॥ त्र्यंबकधनुष्य घेऊन हातीं ॥ आला जनकाचे गृहाप्रती ॥ षोडशोपचारें जनक नृपती ॥ भार्गवरामासी पूजीतसे ॥ ४५ ॥ भोजनासी बैसले गृहांतरीं ॥ शिवधनुष्य ठेवूनि बाहेरी ॥ तों जानकीनें ते अवसरीं ॥ घोडें केलें धनुष्याचें ॥ ४६ ॥ परशुराम भोजन करूनी ॥ सभेंत बैसला येवोनी ॥ तों [7]कोदंड न दिसे नयनीं ॥ भार्गव मनीं क्षोभला ॥ ४७ ॥ म्हणे [8]गजभारीं न लोटे धनुष्य ॥ त्याचा कोणीं केला अभिलाष ॥ परशुराम आणि मिथिलेश ॥ द्वाराबाहेर जों आले ॥ ४८ ॥ तों कोदंडाचें घोडें करूनी ॥ झ्यां झ्यां म्हणोनि ओढी मेदिनीं ॥ परशुरामें तें देखोनी ॥ अंगुळी [9]वदनीं घातली ॥ ४९ ॥ पिता देखोनि [10]जनकबाळी ॥ कोदंड सांडो-

---

१ सहा महिन्यांचें. २ मारला. ३ पेटी. ४ मंदोदरी. ५ रावणाला. ६ पिशाची. ७ धनुष्य. ८ हत्तींनीं. ९ मुखामध्यें. १० सीता.

नियां पळाली ॥ धनुष्य पडलें ते स्थळीं ॥ तें न ढळेचि कवणातें ॥ २५० ॥ वीर लाविले प्रचंड ॥ परी नुचलेचि कोदंड ॥ भार्गव म्हणे हें वितंड ॥ सीतेवेगळें उचलेना ॥ ५१ ॥ मग जनक म्हणे कुमारी ॥ मागुती चापाचें घोडें करीं ॥ सीतेनें बैसोनि झडकरी ॥ पूर्वस्थळासी आणिलें ॥ ५२ ॥ मग बोले फरशधर ॥ आमुचें अवतारकृत्य जाहलें समग्र ॥ मग तेथें धनुष्य ठेवून साचार ॥ जनकाप्रति बोलतसे ॥ ५३ ॥ आतां राया हाचि पण ॥ जो या धनुष्या वाहील गुण ॥ त्यासी सीतेसीं पाणिग्रहण ॥ हा तूं पण करीं मिथिलेशा ॥ ५४ ॥ ऐसें सांगोन जनकासी ॥ भार्गव गेला बदरिकाश्रमासी ॥ विश्वामित्र सांगे श्रीरामासी ॥ पूर्वकथा ऐसी हे ॥ ५५ ॥ कौशिक म्हणे श्रीरामा ऐकें ॥ तुझें चरित्र तुज ठाउकें ॥ परी बोलविसी आमुच्या मुखें ॥ जाणोनियां सर्वही ॥ ५६ ॥ रामविजय ग्रंथ सुंदर ॥ पुढें अष्टमाध्यायीं सीतास्वयंवर ॥ जेथें श्रीराम विजयी साचार ॥ त्याविण आणिका न वरीच ॥ ५७ ॥ ब्रह्मानंदा रघुवीरा ॥ कमलोद्भवजनका श्रीधरवरा ॥ पुराणपुरुषा परात्परा ॥ अक्षय कीर्तन दे तुझें ॥ ५८ ॥ स्वस्ति श्रीरामविजय ग्रंथ सुंदर ॥ संमत वाल्मीकनाटकाधार ॥ सदा परिसोत श्रोते चतुर ॥ सप्तमाध्याय गोड हा ॥ २५९ ॥ ॥ अध्याय ॥ ७ ॥ ॥ ओंव्या ॥ २५९ ॥ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

१ परशुराम. २ अवाढव्य. ३ दोरी चढवील. ४ विवाह.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ धन्य धन्य तुम्ही संतसज्जन ॥ राममहिमार्णवींचे मीन ॥ त्यांतील अनुभवमुक्तें पूर्ण ॥ दृश्यमान सर्व तुम्ही ॥ १ ॥ राजभांडारींचीं रत्नें बहुत ॥ तीं भांडारियासी ठाउकीं समस्त ॥ कीं मित्रप्रभेचा अंत अद्भुत ॥ अरुण एक जाणे पैं ॥ २ ॥ कीं पृथ्वीचें किती वजन ॥ हें भोगींद्र जाणे संपूर्ण ॥ कीं आकाशाचें थोरपण ॥ एक [2]प्रभंजन जाणतसे ॥ ३ ॥ कवीची पद्यरचना किती ॥ हें एक जाणे सरस्वती ॥ चंद्रामृत वानिजे बहुतीं ॥ परी महिमा जाणती चकोर ॥ ४ ॥ कीं प्रेमळ कळा गोड बहुत ॥ हें एक जाणती भोळे भक्त ॥ कीं श्रीरामकथेचा प्रांत ॥ वाल्मीक मुनि जाणतसे ॥ ५ ॥ रामनामाचा महिमा अद्भुत ॥ एक जाणे कैलास-नाथ ॥ कीं चरणरजाचा प्रताप बहुत ॥ [3]विरिंचितनया जाणे पैं ॥ ६ ॥ म्हणोन कथा हे गोड बहुत ॥ येथींचा सुरस सेविती संत ॥ असो सप्तमाध्यायीं गतकथार्थ ॥ राम मिथिलेसमीप राहिला ॥ ७ ॥ देशोदेशींचे जे कां नृप ॥ त्यांसी मूळ धाडी मिथिलाधिप ॥ [4]पृतनेसहित अमूप ॥ राजे लवलाहीं पातले ॥ ८ ॥ मूळ धाडिलें दशरथा ॥ परी तो न येचि सर्वथा ॥ कौशिक घेऊनि गेला रघुनाथा ॥ वियोगव्यथा थोर त्यासी ॥ ९ ॥ माझे कुमर दोघे जण ॥ कौशिक गेला असे घेऊन ॥ माझिया श्रीरामाचें वदन ॥ कैं मी देखेन पूढती ॥ १० ॥ या [5]वियोगानळेंकरून ॥ श्रावणारि [6]आहाळे रात्रंदिन ॥ मिथिलेसी न यावया पूर्ण ॥ हेंचि कारण जाणिजे ॥ ११ ॥ इकडे ऋषींसहित कौशिक ॥ आला ऐकोन राव जनक ॥ नगराबाहेर तात्काळिक ॥ सामोरा आला समारंभें ॥ १२ ॥ मूर्तिमंत सूर्य-नारायण ॥ ऐसा एक एक दिव्य ब्राह्मण ॥ देखतां जनकें लोटांगण ॥ समस्तांसी घातलें ॥ १३ ॥ जनक म्हणे भाग्य अद्भुत ॥ जें घरा आले साधुसंत ॥ आजि मी जाहलों पुनीत ॥ पूर्वपुण्य फळासी आलें ॥ १४ ॥ नृप सादर पाहे विलोकून ॥ म्हणे श्यामसुंदर दोघे जण ॥ कौशिका हे कोणाचे कोण ॥ सुकुमार सगुण आणिले ॥१५॥ कीं शशी आणि चंडकिरण ॥ कीं वाचस्पति आणि [7]सहस्र-नयन ॥ कीं रमापति उमापति दोघे जण ॥ सुवेष धरोनि पातले ॥ १६ ॥ वाटे यांचिया स्वरूपावरून ॥ कोट्यनुकोटी [8]मीनकेतन ॥ टाकावे कुरवंडी करून ॥ पाहतां मन उन्मन होय ॥ १७ ॥ जनकासी म्हणे विश्वामित्र ॥ हे राया दशरथाचे पुत्र ॥ यांचें वर्णावया चरित्र ॥ [9]सहस्रवक्त्रा शक्ति नोहे ॥ १८ ॥ येणें मार्गीं ताटिका वधून ॥ सिद्धीस पाविला माझा यज्ञ ॥ वीस कोटी [10]पिशिताशन ॥ सुबाहुसहित मारिले ॥ १९ ॥ मार्गीं चरणरजेंकरूनी ॥ उद्धरिली [3]सरसिजोद्भवनंदिनी ॥ [11]हरकोदंड पहावें नयनीं ॥ म्हणोनि येथें पातले ॥ २० ॥ साक्षात् शेषनारायण ॥ राया तुवां न करितां प्रयत्न ॥ घरा आले मूळेंविण ॥ सभाग्य पूर्ण तूं एक ॥ २१ ॥ अवचितां जैसा निधि भेटला ॥ चिंतामणि येऊन पुढें पडला ॥ कीं कल्पद्रुम स्वयें आला ॥ गृह शोधीत दुर्बळाचें ॥ २२ ॥ कीं निद्रिस्थाचे मुखांत ॥ अकस्मात पडलें अमृत ॥ कीं क्षुधितापुढें धांवत ॥ क्षीरसिंधु पातला ॥ २३ ॥ कीं शास्त्राभ्यासावांचून ॥ भाग्यें जाहलें [12]अपरोक्ष-

१ खजीनदारास. २ वायु. ३ अहल्या. ४ सेनेसह. ५ विरहाग्नीनें. ६ सुके, करपे. ७ इंद्र. ८ मदन. ९ शेषाला. १० राक्षस. ११ शिवधनुष्य. १२ तत्त्वज्ञान.

ज्ञान ॥ कीं मृत्तिका खणितां निधान ॥ अकस्मात लागलें ॥ २४ ॥ जैं भाग्योदयें होय नृपती ॥ तरी घरींच्या दासी सिद्धि होती ॥ कल्पिलें फळ तत्काळ देती ॥ आंगणींचे वृक्ष जे कां ॥ २५ ॥ हातीं कांचमणि धरितां ॥ तो चिंतामणि होय तत्त्वतां ॥ तृणगृहें क्षण न लागतां ॥ सुवर्णमंदिरें पैं होती ॥ २६ ॥ [1]खडाणा गाई दुभती ॥ वैरी तेचि मित्र होती ॥ विशेष प्रकाशे [2]निजमती ॥ राजे पूजिती येऊनि घरा ॥ २७ ॥ समयोचित होय स्फूर्ती ॥ दिगंतरा जाय कीर्ती ॥ पदोपदीं निश्चितीं ॥ यश जोडे तयातें ॥ २८ ॥ असो जनकासी म्हणे विश्वामित्र ॥ तुझा आजि उदय पावला भाग्यमित्र ॥ घरासी आला [3]स्मरारिमित्र ॥ सकळ [4]अमित्रां त्रासक जो ॥ २९ ॥ जनकें करूनि बहुत आदर ॥ विश्वामित्र श्रीराम सौमित्र ॥ निजसभेसी आणोनि सत्वर ॥ मान देऊन बैसविले ॥ ३० ॥ देशोदेशींचे नृपती ॥ राम पाहोनि आश्चर्य करिती ॥ सीता द्यावी हो याप्रती ॥ नोवरा रघुपति साजिरा ॥ ३१ ॥ एक म्हणती स्वयंवरीं केला पण ॥ भार्गवचापासी चढवावा गुण ॥ हें कार्य परम कठिण ॥ रामास केवीं आकळे ॥ ३२ ॥ मनांत म्हणे जनक नृपवर ॥ जरी जांवयी होईल रघुवीर ॥ तरी माझ्या भाग्यास नाहीं पार ॥ परी पण दुर्धर पुढें असे ॥ ३३ ॥ तंव तया मंडपांगणीं ॥ परम चतुर चपळ करिणी- ॥ वरी दिव्य [5]चंवरडोल जडितरत्नीं ॥ झळकतसे अत्यंत ॥ ३४ ॥ त्यामाजी बैसली जनकबाळा ॥ हातीं घेऊनियां दिव्य माळा ॥ विलोकित सकळ भूपाळां ॥ ऋषिवृंदांसहित पैं ॥ ३५ ॥ जवळी सखिया सकळ असती ॥ श्वेत चामरें वरी ढाळिती ॥ एक क्षणक्षणां शृंगार सांवरिती ॥ विड्या देती एक तेथें ॥ ३६ ॥ जे त्रिभुवनपतीची मुख्य राणी ॥ आदिमाया [6]प्रणवरूपिणी ॥ जे इच्छामात्रेंकरूनी ॥ ब्रह्मांड हें घडीमोडी ॥ ३७ ॥ ब्रह्मादिक बाळें आज्ञेंत ॥ आपुले निजगर्भीं पाळित ॥ तिचें स्वरूपलावण्य अद्भुत ॥ कवणालागीं न वर्णवे ॥ ३८ ॥ अनंत शक्ति कर जोडून ॥ जीपुढें ठाकती येऊन ॥ जिनें आदिपुरुषा जागें करून ॥ सगुणत्वासी आणिलें ॥ ३९ ॥ या ब्रह्मांडमंडपामाझारी ॥ जनकात्मजेऐसी सुंदरी ॥ उपमा द्यावया दुसरी ॥ कोणे अवतारीं नसेचि ॥ ४० ॥ जैसें जांबूनदसुवर्ण तप्त ॥ तैसें सर्वांग दिव्य विराजित ॥ आकर्ण नेत्र विकासित ॥ [7]मुखमृगांक न वर्णवेचि ॥ ४१ ॥ मुखीं झळकती दंतपंक्ती ॥ बोलतां जिकडे पडे दीप्ती ॥ पाषाण ते पद्मराग होती ॥ वाटे रत्नें विखुरती बोलतां ॥४२॥ जानकीचे अंगींचा सुवास ॥ भेदोन जाय महदाकाश ॥ जिनें भुलविला आदिपुरुष ॥ आपुल्या स्वरूपविलासें ॥ ४३ ॥ पाय ठेवितां धरणीं ॥ पद्मुद्रा उमटती जे स्थानीं ॥ तेथें वसंत येऊनी ॥ लोळत भुलोनि सुवासा ॥ ४४ ॥ चंद्रसूर्यांच्या गाळिल्या ज्योती ॥ तैसीं कर्णपुष्पें अत्यंत झळकती ॥ कर्णीं मुक्तघोंस ढाळ देती ॥ कृत्तिकापुंज जैसे कां ॥ ४५ ॥ आकर्णपर्यंत विशाळ नयन ॥ माजी विलसे [8]सोगियाचें अंजन ॥ कपाळीं [9]मृगमद रेखिला पूर्ण ॥ वरी बिजवरा झळकतसे ॥४६॥ शीत दाहकत्व सांडोनी ॥ शशांक आणि वासरमणी ॥ सदा विलसती दोन्ही ॥

१ भाकड झालेल्या. २ स्वतांची बुद्धि. ३ शंकराचा मित्र श्रीराम. ४ शत्रूंना. ५ अंबारी. ६ ओंकाररूप. ७ मुखचंद्रमा. ८ सुरम्याचें अंजन. ९ कस्तूरी.

